# भां ग तु रा

डॉ. सरोजिनी बाबर

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई

प्रकाशक

सचिव,
महाराष्ट्र राज्य
साहित्य–संस्कृती मंडळ
मंत्रालय,
मुंबई ४०००३२

मूल्य बत्तीस रुपये

प्रथमावृत्ती : जून १९८३.



मुद्रक

चिंतामणी सदाशिव लाटकर
कल्पना मुद्रणालय
' शिव-पार्वती '
टिळक रोड, पुणे ३०



भारतीय संस्कृतीचे महान उपासक

आणि

नवभारताचे शिल्पकार

पंडित जवाहरलाल नेहरू

यांच्या पुण्य स्मृतीस सादर

# प्रास्ताविक

तसे पाहिले तर ‘ भांगतुरा ’ हा ललित निबंधांचा संग्रह; लोककथा आणि लोकगीते यांच्या नाजूक गुंफणीतून निर्माण झालेला. पण त्यात दिसते आपल्या अस्मितेचे, परंपरेचे लोभस रूप. शहराऊ संस्कृतीत मराठमोळ वळण नाही. आपला इतिहास जोपासला आहे आमच्या ‘ खेडवळ ’ दंतकथांनी, दिव्यकथांनी, लोकगीतांनी, लोककथांनी. तेच आमच्या काव्याचे, इतिहासाचे मूळ रूप. म्हटले तर हा इतिहास अनादिकालापासून झिरपत झिरपत आलेला, म्हटले तर आज घडत असलेला, मोगऱ्याच्या फुलासारखा, टवटवीत आणि सुवासाने दरवळणारा. आमच्या संस्कृतीच्या या मूलस्रोताचे जतन झाले पाहिजे, ते आजच्या आमच्या सामाजिक जीवनाशी मिसळले पाहिले. डॉ. सरोजिनी बाबर यांच्या या ललित निबंधांच्या संग्रहाची ही अशी चौकट. आज ‘ दिव्या दिव्या दीपत्कार ’ कोणी म्हणत असेल किंवा नाही कोण जाणे, पण ‘ कानी कुंडल मोतीहार ’ची संस्कृती दिव्याच्या उजेडात पाह्यलाही माणसाला अनंत काळ श्रम करावे लागले हे लक्षात ठेवले पाहिजे. त्यातूनच ‘ घरात पेटविलेली चूल ’ देखील पुटपुटते,

शंभराचं शिजवीन
लक्षांना पुरवीन
हांडाभर उरवीन
मुली ग मुली

शंभरांचं शिजवून लक्षांना पुरविण्याची आपली संस्कृती, आपला इतिहास, आपल्या मनातील इच्छा—आजही जर त्यांची जाणीव आपणास जनमानसात रुजविता आली तर दरिद्रयांचा नारायण व्हायला वेळ लागणार नाही. माणसाच्या मनोवृत्तीची कथा, शोषक आणि शोषितांची कथा, शक्तीची कथा, हे सारे

काय केवळ आजच्या समाजाचे स्वरूप आहे. ज्या काळात कावळे, चिमण्या बोलत होत्या, राजा ' प्रजानुरंजना 'साठी राज्य करीत होता, आणि आवडत्या नावडत्या राण्याही राजाच्या प्रेमासाठी त्याला जपत होत्या त्याही काळात माणसाचे मन आजच्या मानवी मनापेक्षा वेगळे नव्हते. सरोजिनीबाई चिमणीला सापडलेल्या मोत्याची कथा सांगतात. कावळा चिमणीला फसवून मोती कसा नेतो ते सांगतात, सुतार, राजा, राणी, उंदीर, मांजर, कुत्रे, हत्ती, पाणी–अगदी हे सारे आजच्याही समाजात आहेच – चिमणीशी कशी टाळाटाळ करितात, व शेवटी मुंगीसारख्या लहानशा प्राण्याच्या सहाय्याने चिमणी कशी आपले मोती परत मिळविते याचेही दर्शन या लोककथेतून – बालकथेतून घडते. ही कथा माझ्या आईच्या तोंडून मी प्रथम ऐकली. थोड्याशा वेगळ्या स्वरूपात. आईच्या कथेत चिमणी नसून बुढी ( म्हातारी ) आहे. कथा अशी : एक होती बुढी, ती गेली कुप कुप, तिला सापडला पैसा, त्याचे आणले फुटाणे आणि खात बसली झाडाच्या ढोलीवर. खाता खाता एक फुटाणा पडला झाडाच्या ढोलीत. बुढी म्हणाली, झाडा झाडा माझा फुटाणा दे रे, झाड म्हणाले मी नाही देत जा. ( आपले धन दुसऱ्याच्या हातात गेल्यावर तो परत थोडेच करणार हे अनादि सत्य ) या गोष्टीत शेवटी बुढी मुंगीकडे जाते आणि मुंगी म्हणते मी नाही शिरणार हत्तीच्या कानात. ( सारेच स्थितिवादी लोक असेच वागतात, त्यांचा आपसात करारच झाला असतो म्हणाना ). तेव्हा बुढी म्हणते, ठीक आहे, चिरडू तुला पायाखाली ? ( बुढीची ताकद मुंगीच्या ताकदीपेक्षा अधिक ). मुंगी त्यामुळे सरळ होते, बुढीला मदत करते व तिला अपेक्षित असलेला सामाजिक बदल घडवून आणते. कथा तीच, चित्रविचित्र वेष परिधान करणारी, निरनिराळ्या स्वरूपात प्रगट होणारी.

आणखी एक लोकगीत, भुलाबाईच्या गाण्यात अमर झालेले.

' कारल्याची बी पेर व्हं सूनबाई, मग जाय अपुल्या माहेरा '

सासू-सुनेची एकमेकीशी वागण्याची रीत–अज्ञान लोककवींनी अमर करून ठेवलेली, कारकून, नोकरशहा यांच्या लाल फितीत पण आढळणारी आमची सनातनी रीत, सरोजिनीबाईनी आपल्या निबंधात टिपली आहे.

माहेरच्या चंद्रातही असेच. भाऊबहिणीची माया, लोभ, रुसणे, फुगणे :

साऱ्या साऱ्याचा कलापूर्ण आविष्कार
वहिनीबाई भावजयी तुझं बोलणं धसाफसा
माझा कल्याणी आरसा भाऊराया....
घोड्याला घासदाणा देते बदाम कुटून
आला परगणा लुटून भाऊराया

परगणा लुटण्यालाही या जगात मान्यता आहे, हे पण लक्षात ठेवले पाहिजे. माणसाचे भावविश्व स्वत:भोवतीच फिरत असते, आपपरभाव आला की दुसऱ्याचे धन लुटणे हे पण नैतिकच, त्यामुळे आजची सामाजिक वैषम्याची स्थिती उत्पन्न होऊ शकते. पण हे वैषम्यही 'मायेपोटी'च उत्पन्न होते हे पण लक्षात ठेवले पाहिजे.

आईबापांच्या प्रेमाचाही असाच साक्षात्कार—
फुलामंदी फूल सये
उत्तम चाफ्याचं
सुख भोगावं पित्यायाचं,

अशासारख्या कवनांचा शेवट,

अमृताचा डेरा घुसळण्यात, आणि
'मायबाईच्या' सीतळ सावलीत विसावा घेण्यात होतो.

सरोजिनीबाई भांगतुऱ्याद्वारे आपल्या मराठमोळ समाजाचे भावचित्र आपणासमोर उभे करतात हेच या ललित-निबंधांच्या संग्रहाचे खरे सार.

भांगतुऱ्यासारखे आतून बाहेरून नितांत सुंदर असलेले शारदेचे लेणे प्रसिद्ध करावयास साहित्य संस्कृती मंडळाला आनंदाचे भरते येणे साहजिकच आहे.

पुणे
३ एप्रिल १९८३

**सुरेंद्र बारलिंगे**
अध्यक्ष महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

# १

## भांगतुरा !

आली रात्र सरत नाही न् सांगती गोष्ट संपत नाही अशा खानदानीत वाढलेला आमचा पिंड गावाकडचं निर्मळ अंगण नजरेला दिसलं की, स्वत:लापण विसरावं म्हणतो. तेजाळ रत्नागत अशा वेळी आमची नजर चमकते आणि गोष्ट ऐकून तृप्ती न झालेले कान कसे टवकारावे म्हणतात. त्यातून पखंटया साडीतली लाडकी मैना भुईला लोळतेला पदर सावरीत नाहीतर डोईवरच्या पटक्याचा शेमला लोढण्यागत लोळवीत एखादा राजसबाळ घराचं जोतं चढून वर येतेला दिसावा म्हणजे हरखून टुम्म व्हायला होतं. ह्या चिमण्या पोरांनी ओसरीवरच्या खामनीवर ठेवलेल्या दिव्याला हात जोडीत—

दिव्या दिव्या दीपत्कार
कानी कुंडल मोतीहार...

असं म्हणायचा अवकाश की, हा दिवा देखील समाधानानं लुकलुकत लामण दिव्याच्या रुबाबानं बोलावं म्हणतो—

जाईन आपुल्या मंदिरा
येईन उद्याच्या सांजेला
आवडल्या राणीला

नावडल्या राणीला
फार फार विचारलंय सांगायला

त्यामुळं ह्या घराची काया कशी मोहरून उठते. दिवसभराच्या कामानं आळसावलेलं घर हुषारीत येईन म्हणतं. आणि मग तिथली सारी दुनिया झोपाळायची सोडून रायाइंद्राची भाषा करावी म्हणते. अशावेळी घरात पेटलेली चूल देखील पुटपुटते कशी—

शंभराचं शिजवीन
लक्षांना पुरवीन
हांडाभर उरवीन
मुली ग मुली

त्या कारणानं बारक्या पोरीबाळींचं काम मागं सरतं. आणि एखादी म्हातारी आजी नाहीतर मावशी पोरांना दूधभात कालवून देत त्यांचा लाड करीत म्हणाली की, ह्यांना दाबून फावलंच म्हणा. सगळी पोरं एकमेकांना हाकारा घालीत घर डोक्यावर घ्यावं म्हणतील न् जेवता जेवताच गोष्टींचं पेव फुटेल सुद्धा !

कुंभारा कुंभारा
दे दे मडकुल्ला
जाऊ जाऊ गंगुल्ला
घेऊ घेऊ पाणुल्ला
धुवू धुवू चुचुल्ला
जाऊ जाऊ वऱ्हाडा
खाऊ खाऊ मांडुल्ला
गुडगुंच्या गो गुडगुंच्यो

असल्या भाषेला मग जोर चढेल आणि वडिलधाऱ्यांचं पण काळीज खुलून जाईल. उसळ्या घेतेल्या पोरांच्या कवतिकाला उधाण आलं पाहिजे असा

त्यांनी यावेळी मग निर्णय घेतलाच म्हणा. त्यामुळं एखाद्या चिमुरडीनं आजीच्या नाहीतर मावशीच्या खांद्यावर लोळण घेत, " एकदा काय झालं की, एक म्हातारी मुसळ घेऊन गहू कांडत होती हं ! तर उखळातून गहू वर उसळायचे. म्हणून ते वरच्यावर झेलावेत या बेतानं आभाळ लागलं त्या म्हातारीच्या पायात पायात घुटमळायला. तशी मुसळाचा दणका बसला आभाळाला. म्हणताना आभाळ एवढं भ्यालं, अस्सं घाबरलं की, त्या दिवसापासून जे वर पळालं ते पुन्हा म्हणून खाली आलंच नाही ...झाली गोष्ट. " अशी काळजाची पकड घेतली म्हणजे तिथं इंद्रसभा चंद्रसभा बसलीच म्हणून समजावं. हिऱ्यामोरावरचा हरी न् इंद्रसभेची पद्मिनी मग तिथं आलीच !....जेवण राहातं मग तिथल्या तिथंच आणि सतरांदा लोणच्याची चव घेत जिवाचा आनंद लुटावा त्या धर्तीनं कुणीतरी गोष्ट सांगायला पुढं येतं. अशा वेळी पाच-सात वर्षांचा बाळराजस वाघ मागं लागल्यागत घाईगर्दीनं न् धापा टाकीत आपल्या ठेवणीतली गोष्ट सांगायला मध्येच सुरवात पण करतो—

" एक होती चिमणी न् एक होता कावळा. दोघे जंगलात गेले. तर चिमणीला सापडले मोती. कावळ्याला सापडला हरभरा. त्यानं तो खाल्ला. चिमणीकडे गेला. म्हणाला, ' चिम्मीबाई चिम्मीबाई बघु तुझे मोती ? चिमणी म्हणाली, ' नक्को नक्को. चोरून बिरून नेलेस तर काय करू ?' पण हा म्हणाला, ' छे ग ! नाही चोरणार. बघून तुला लग्गेच परत देतो. तेव्हा चिमणीने त्याला मोती दिले न् मग तो गेला की लगेच उंच उडून ! बसला एका झाडावर येऊन. चिमणी मोठ्याने ओरडली, ' माझे मोती दे ? ' तर तो म्हणतो कसा, ' नाही देत जा ! ' मग चिमणी गेली झाडाकडे. म्हणाली, ' झाडा, झाडा, कावळ्याला पाड रे तुझ्या अंगावरून.' झाड म्हणाले, ' मी नाही पाडीत जा. ' तेव्हा चिमणी गेली सुताराकडे. म्हणाली, ' सुतारा, सुतारा, झाडाला तोडून टाक रे. ' सुतार म्हणाला, ' मी नाही तोडीत जा. ' चिमणी गेली राजाकडे. म्हणाली, ' राजा, राजा, सुताराला दंड कर रे. ' राजा म्हणाला, ' मी नाही जा दंड करणार. '

तेव्हा चिमणी गेली राणीकडे. म्हणाली, ‘ राणी, राणी, राजावर रूस गो. ’ राणी म्हणाली, ‘ अंहं ! मी नाही रुसायची. ’ मग चिमणी गेली उंदराकडे. म्हणाली, ‘ उंदरा, उंदरा, राणीचे लुगडे फाड़ रे, ’ उंदीर म्हणाला, ‘ नाही रे बाबा. मी नाही फाडणार. ’ तेव्हा चिमणी गेली मांजराकडे. म्हणाली, ‘ मांजरा, मांजरा, उंदराला खाऊन टाक रे. ’ मांजर म्हणाले, ‘ मुळीच नाही. ’ मग चिमणी गेली कुत्र्याकडे. म्हणाली, ‘ कुत्र्या, कुत्र्या मांजराला चाव रे. ’ कुत्रा म्हणाला, ‘ मी नाही जा. ’ चिमणीला राग आला. मग ती गेली सोट्याकडे. म्हणाली, ‘ सोट्या, सोट्या, कुत्र्याला ठोक-मार दे रे. ’ ‘ सोटा म्हणाला, ‘ मी नाही जा. ’ तेव्हा चिमणी गेली अग्नीकडे. म्हणाली, ‘ अग्नी, अग्नी, सोट्याला जाळून टाक रे. ’ अग्नी म्हणाला, ‘ छे ! मी नाही ऐकणार तुझं. ’ मग चिमणी गेली समुद्राकडे म्हणाली, ‘ समुद्रा, समुद्रा, अग्नीला विझवून टाक रे. ’ समुद्र म्हणाला, ‘ मी नाही जा. ’ तेव्हा चिमणी खूप खूप रागावली, गेली हत्तीकडे. म्हणाली, ‘ हत्ती, हत्ती, समुद्राला ढवळून टाक रे. ’ हत्तीनं म्हटलं, ‘ मी नाही ढवळणार जा. ’ मग चिमणी संतापली. गेली मुंगीकडे न् म्हणाली, ‘ मुंगे मुंगे, हत्तीच्या कानात शीर गो. ’ मुंगी ‘ हं !’ म्हणाली. त्या सरशी हत्ती म्हणाला, ‘ नक्को, नक्को, मी समुद्र ढवळून देतो. ’ समुद्र म्हणाला, ‘ नक्को, नक्को. मी अग्नीला विझवतो.’ अग्नी म्हणाला, ‘ नक्को, नक्को. मी सोट्याला जाळतो. ’ सोटा म्हणाला, ‘ नक्को नक्को. मी कुत्र्याला ठोकतो. ‘ कुत्रा म्हणाला, ‘ नक्को नक्को. मी मांजराला चावतो. ’ मांजर म्हणाले, ‘ नक्को नक्को, मी उंदराला खातो. ‘ उंदीर म्हणाला, ‘ नक्को, नक्को, मी राणीचे लुगडे फाडतो. ’ राणी म्हणाली, ‘ नक्को नक्को, मी राजावर रुसते. ’ राजा म्हणाला, ‘ नक्को नक्को. मी सुताराला दंड करतो. ‘ सुतार म्हणाला, ‘ नक्को नक्को. मी झाड तोडतो. ’ झाड म्हणाले, ‘ नक्को नक्को. मी कावळ्याला पाडतो. ’ कावळा म्हणाला, ‘ नक्को नक्को. मी मोती देतो. ’

कावळ्यानं मग चिमणीचे मोती चिमणीला दिले. चिमणीला खूप खूप

आनंद झाला.

इटुकली मिटुकली गोष्ट सरो. तुमचे आमचे पोट भरो. "

त्यामुळं गोष्टीचा उपसा ईर्षेनं होत जातो आणि ही मुलं ओसरीवर येऊन आजोबांच्या भोवती भोवती तरंगत सुटतात. तशी आजोबांना हसू फुटतं न् ते गमतीचा आवाज काढीत बोलून जातात—

तुझं नाव काय ?
तालिमतोला.
खातोस काय ?
भाजीपाला.
मुलंबाळं किती ?
पंधरा सोळा.
बायको कुठं गेली ?
म्हायाराला.
तुला रे जेवायला ?
वाघोबा आला.

त्या कारणानं आजीला पण सुरसुरी येते न् आपल्या दात पडक्या तोंडात जीभ खेळवीत तालासुरावरची तिचीही गोष्ट रंगत पुढे येते—

आंबा जो कोवळा
त्याचा मोहोर मी पाहिला
तो बाई मोहोर पीकला
त्या ग मोहोराचं
लोणचं मी घातीलं
ते बाई लोणचं
दिराला मी वाढीलं
त्या बाई दिरानं

चुडे ग मला दिले
ते बाई चुडे मी
खेळताना वाढविले
त्या बाई सासूनं
धपाटे मला घातीले
त्या बाई धपाट्यानं
आसुवं माझी गळाली
ती बाई आसुवं ग
तांब्यात मी भरीली
तो बाई तांब्या
गंगेत मी सोडीला
त्या बाई गंगेनं
उदक मला ते दिलं
ते बाई उदक मी
कुडाला पाजीयीलं
त्या ग कुडानं बाई
काठी मला दिली
ती बाई काठी मी
बुरडाला आणून दिली
त्या बाई बुरडानं ग
परडी मला दिलीन्
ती बाई परडी मी
माळ्याला सये दिली
त्या ग माळ्यानं सई
फुलं मला दिली
ती बाई फुलं मी
देवाला अर्पण केली

ईश्वर पार्वतीच्या
चरणावर मी वाहिली

आणि मग कहाणीला खरी रंगत येत जाते. अशा वेळी मध्यान रात्रीचा चंद्र खाली कलायच्या अगोदर.या चोख्या मेळ्यात येऊन बसावं म्हणतो न् गोष्टीला कान देतो ! आपलं चांदणं पुरतं भोगायच्या अगोदरच तेला-तुपाचं दिव्याला भरण घालीत तिथं बसायला तो उतावीळ होतो. एवढ्यात त्याच्या कानावर पडतं की—

"अगदी म्हणजे अगदी जुन्या काळी समुद्राच्या काठावर भाकरीचं पीठच पीठ होतं. तर ज्याला भूक लागेल त्यानं तिथं जावं, लागेल तेवढं पीठ घ्यावं न भाकरी करून खावी. पण लागेल त्यापेक्षा कुणी चिमूटभरही जादा पीठ घ्यायचं नाही हा कायदा. पण एकदा काय झालं की, एका बाईच्या मनात निराळाच विचार आला. म्हणाली की, रोज रोज कुठंवर समुद्रावर जायचं ? म्हणून गेली न् चांगलं चार सहा दिवस पुरेल एवढं पीठ घेऊन आली. त्याचा परिणाम वाईट झाला. उरलेल्या पिठात चंद्रानं लोळण घेतली न् सगळंच पीठ नाहीसं झालं !...उरली ती फक्त वाळू त्या जाग्यावर !...तेव्हापासून समुद्राच्या काठी वाळूच वाळू आली ! मग बरीक आपल्याला कुणी काही विचारील या धास्तीनं तो तिथून हलकेच पाय काढून घेऊन खालल्या अंगाला कलतो..."

तेवढ्यात रत्नाचा दांडा पुजलेल्या, मोत्यांचा भांग भरलेल्या, अर्धचंद्र शीसफूल मिरवतेल्या, अंगी मदब्याची चोळी ल्यालेल्या, माथ्यावर मोत्यांची जाळी घातलेल्या, जाईजुई-शेवंतीचे हार ल्यालेल्या, जरतारी साडी नेसलेल्या आणि शिरी बाशिंग बांधलेल्या कृष्णदेवांच्या रुक्मिणीची गोष्ट सांगायची आहे असा पुकार करीत आजोबा हातावर तंबाखू मळून चिलमीत बार भरीत पोरांना हावळा खायला देतात. त्या कारणानं पोरांच्या कानात कधी काळी कुठंतरी कुणीतरी गाइलेलं झाडामाडांच्या लग्नाचं गीत घुमतं आणि त्यांच्या नजरेसमोर लिंबराणी, फणसकुवरी, सहीडाळिंबी, खजुरी, जांभूळी, चिंच सुंदरी असल्या मानापानाच्या करवल्या येतात. म्हणताना

हावळा मोठ्या चवीनं खाल्ला जातो. आणि जिला कधी मरण नाही, जिचा तजेला कधी कोमेजत नाही न् कधी कुणी विसरत नाही अशा डामडौलाच्या कहाणीला आजोबा आठवणीत घोळवतात. भांगतुऱ्याच्या रत्नजडित दागिन्यागत मग...

आंकणं काकणं
सोन्याचं झाकण
तान्ह्या बाळाला
देवाची राखण

या अपेक्षेनं नटलेली न् आजोबा सांगतेली कथाराणी तोंडानं काढून हातानं पेरावी अशी झोकात कानावर येऊ लागते...

" लईंदी झालं गा या गोष्टीला. तवाच्या येळला इंद्रदेव बसलंवतं सभेला. दरबार खच्चून भरलेला. सरदार मानकरी, भालदार चोपदार जमा झालेले. तशी इंद्रदेवाच्या मनात काय आलं कुणाला माहीत, आपल्य साती लेकींला त्यानं दरबारात बोलीवलं. विचारलं कसं, " तुम्ही कुणाच्या कोण पोरी हो ? " तशी " आम्ही तुमच्या लेकी देवा " पोरींनी असं उत्तर केलं. मग इंद्रानं पुन्हा विचारलं, " कुणाच्या जिवावर जगता तुम्ही ? " सहा पोरींनी त्यावर उत्तर केलं, " तुमच्या तुमच्या ! " पण सातवी ठसक्यानं बोलली, " मी माझ्या जिवावर जगते ! " त्यासरशी इंद्रदेवाला राग आला. संतापाच्या भरात त्यानं तिला शाप दिला, " भूलोकी चालती हो." आणि जादूची कांडी फिरवून तिला चार महिन्यांची पोरगी केली ! आता काय करावं ? दरबार विचारात पडला. पण इंद्रानं एका सरदाराला हुकूम सोडला, " घेऊन जा हिला. द्या फेकून जंगलात." तशी त्या बाबानं हिला उचलली. पोटाशी धरली. घरला आला. सोन्यानं मढविलेल्या पेटीत हिला निजवली. पेटी डोक्यावर घेतली मोत्या चुंबळीवर अधांतरी ठेवली. निघाला. आला स्वर्गलोकातून धरणीवर. गाठलं जंगल. तिथे ही पेटी ठेवली न् त्या पोरीला 'तुझं उदंड होईल'

असा आशीर्वाद देऊन माघारी फिरला.

इकडे तोवर ढोलनाच करतेले धनगर त्या जंगलात आले. दिवसा उजेडी काय गा चकाकतंय म्हणाले न् त्या पेटीजवळ आले. बघतात तर सोन्यानं मढविलेली पेटी. ती बघून देवाची कृपा झाली म्हणाले. नाचगाणं केलं उभं गाव आलं. आणिक एकानं जिवाचा धडा करून ती पेटी उघडली तर आत तान्हं बाळ मुठी चोखीत निजलेलं ! ह्यांना बघून खुदकिनी हसतेलं. तशी तिथे केवढा आनंद उभा राहिला ! त्या धनगरानं हे बाळ उचललं. गेला घरला घेऊन. स्वतःच्या पोरागत जोपा केली. बिरुबा देवाची रोज पूजा बांधली.

होता होता ह्या पोरीला आकरावं सरून बारावं लागलं. तशी रीती-रिवाजाप्रमाणं त्या धनगरानं हिचं लगीन करायची भाषा केली. तर हिनं त्याला साफ सांगून टाकलं, “ काळजी नको. माझा नवरा मी बघीन. ” बिचारा धनगर गप्प बसला.

हिनं मग शंकराची पूजा बांधली. स्वतः तप करीत बसली. एक दिवस मग तिथं एक म्हातारा साधू आला. त्यानं हिला खडाव दिले. हे खडाव पायात घाल म्हणाला. म्हणशील तिथं ते तुला नेतील बोलला न् स्वतः निघून गेला. हिनं मग प्रचीती घ्यावी म्हटलं. खडाव पायात घातले. माझ्या पतिदेवांचेकडे चल म्हणाली. तर काय चमत्कार म्हणावा ? खडाव हिला घेऊन जे उंच उंच उडाले ते थेट जेजुरीला येऊन थांबले !

तिथं मल्हारीदेव न् म्हाळसा रंगमहालात निजलेवते. मल्हारीच्या रूपानं ही भाळली. काजळकडांना बोट घातलं. पदराची धांदोटी फाडली. बोटानं कायसंसं लिहिलं. खुदकन् हसली आणि खडावांच्या संगतीनं पुन्हा आपल्या घरी आली. शंकराच्या पूजेला बसली.

इकडे तोवर मल्हारीला जाग आली. त्यानं ती पत्रिका वाचली. त्याचं भान गेलं. हाडबडून उठला. म्हाळसा दचकली. तिनं मग सारीपाटाचा डाव मांडला. मल्हारी खेळायला बसला. पण जाग्यावर चित्त होतंच कुठं ? सारखा डाव हारत चालला. ह्यानं डाव हरला तर जंगलात निघून जायचं

न् तिनं हरला तर गळक्या घागरीनं रांजण भरायचे अशी पैज लागली. डाव म्हाळसानं जिंकला. मल्हारी राज्य सोडून जंगलात निघून गेला.

वाटेत देऊळ लागलं. तिथल्या देवानं दर्शन दिलं. म्हाताऱ्याचं रूप घेऊन अशा अशा ठिकाणी जा म्हणाला. मल्हारी म्हातारा झाला. जख्खड म्हातारा हं !....गेला बानूच्या घरी. धनगरांच्या वाड्यावर. ह्याला बघून तिनं हुकूम सोडला. " मेंढरं वळीत बैस." हा ' बरं ' म्हणाला. गेला मेंढरं घेऊन.

पण होता होता एक दिवस काय झालं की, मल्हारीनं मेंढरांचं कातडं न् मांस बाजूला केलं ! त्यासरशी रक्ताचा-पाट वाहायला लागला!... बानू घाबरून उठली. त्याच्यावर कडाडली, " हे काय केलंस? भरून दे माझी मेंढरं." तशी हा शांतपणे म्हणाला, " देतो देतो. पण माझी बायको झालीस तरच ! " त्या सरशी हिचा जळफळाट उडून गेला. दात-ओठ खात ती ओरडली, " मेल्या कुणाशी बोलतोयस तू हे ? " तो म्हणाला, " तुझ्याशी ! तुझ्याशी ! का ? " आणि मग दोघांची ही जुंपली !

शेवटी रडकुंडीला येऊन बानू लग्नाला तयार झाली. मग मल्हारीनं ती मेंढरं जशीच्या तशी साजिवंत केली. दोघांचं लगीन लागलं. लोकरीचे हार एकमेकांनी एकमेकांना घातले. धनगर सुखावला. बानू रड रड रडली. काय पदरात पडलं म्हणून तिनं सारी दुनिया डोक्यावर घेतली.

तेवढ्यात मेघ गरजले. वीज कडाडली. आभाळ दणाणलं न् मल्हारी पहिलं रूप घेऊन बानूपुढं उभा राहिला!....त्या दर्शनानं बानूचा आनंद गगनात मावेना. राजी-खुषीनं आपली थरारती काया तिनं मल्हारीच्या पुढ्यात झोकली न् घोड्यावर स्वार होऊन दोघेजण जेजुरीला निघून गेले..."

त्यावेळी घरात कुणीतरी कवतिकानं गीत गुणगुणतं....

" काळी चोळी मोती जाळी
हार गुंफी गळ्या घाली
काळी करटूली कारली
वटी मैनाची भरली
आमी गौळणी बायका
इंद्रावनी गोष्ट सांग
दिल्लीच्या नायका
झाडावर मोर काय
बोलतो ऐका...

आणि पाठोपाठ " चांदोबानं चांदणं भोगलं का नाही, झाडाला पालवी फुटली का नाही, पोतीला बिरडं लावलं का नाही, दारातला चाफा फुलला का नाही, उगवती नक्षत्रं दिसली का नाही, अंगणाला रांगोळी आली का नाही, म्हशीला वासरू सोडलं का नाही, गोष्टींचा मेळा उठला का नाही ?" असले प्रश्न विचारतेली घरची कर्ती मालकीण एकेकाला धारोष्ण दूध प्यायला बोलवते ! त्यामुळं या बैठकीला चढलेला रंग आणखीनच खुलून दिसतो आणि उगवत्या सूर्याच्या साक्षीनं दुधतुपाच्या न्याहारीची पंगत आजीच्या भोवती गोळा होते. अशावेळी " एक होता राजा " आणि " आटपाट नगर होतं " या भाषेला पुन्हा असा ऊत येतो की, आधणीच्या उकळीगत मनात दाटलेल्या, ध्यानात धरलेल्या, चटका लावून सोडतेल्या गोष्टी नव्या उमेदीनं सरसावून पुढं येतात. त्या नादात कशाचं भान कुणाला उरत नाही का असं न् तसं पण वर्दळीवर येत कुणी कुणाला म्हणत नाही ! अंहं !

# २



## माहेरचा चंद्र !

ध्यानीमनी नसताना त्या दिवशी सोन्याचांदीच्या घंगाळात सूर्यदेव डोलला, रसवंती बोलणं ढेलजेत घुमलं आणि केळीच्या कोक्यातल्या मावळतीनं माहेरच्या गिलाव्याची भिंत साईनसंगीत आणून उगवत्या चंद्रागत माझ्यापुढं अवचितच उभी केली. तशी जिवाला कशी एकदम थंडाई आली. मथुरेच्या खव्यागत ज्याला त्याला हवाहवासा वाटणारा माझ्या काळजाचा हा घड मी बघितला मात्र आणि माझ्या ओठांनी गाजावाजा केला—

नदीच्या पल्याड बेट फुललं लव्हाळ्याचं
बंधूजी राजस मला भेटलं जिव्हाळ्याचं

त्यासरशी जागोजाग मऊमऊ हरीक दाटलेल्या मखमली वाटेनं माहेरची पाऊलवाट सजवली आणि माझ्या नजरेला टिप्पूर चांदण्याची शोभा आणून दिली. म्हणताना जीव जसा काय खुललाच ! जन्माला येऊन एकडाव का होईना बहीणभावांच्या प्रेमाची गोडी चाखावी म्हणणारी मी गेले पार भुलून. आम्हा चौघीपाचजणींच्या पाठीवर सातानवसानं उगवलेली ही चंद्रकोर अशा लाडाकोडात वाढलेली की, शेलापागोट्याचं सोगं भुईला लोळवीत हा चाफा चंदन आपल्या मनानं माझ्या घरी येईल हे खरंच

वाटेना तर ! शंभर वेळा त्याला ' येऊन जा एक वेळ ' म्हणणाऱ्या मी...

पान फूल पुरे, पुरे अक्षता सुपारी
नको शेला जरतारी भाऊराया

ही भाषासुद्धा त्याच्याजवळ केलेली, तर ह्यानं कधी ढम्मदेखील म्हटलं नाही ते ! त्या कारणानं आल्यागेल्यांजवळ सांगावा देता-घेताना खुळ्यागत

माझ्या ग माहेरात सदा उघडं ते दार
आल्यागेल्या पाहुणचार होत असे...

मी आपलीच अशी समजूत घालावी आणि नाही नाही ते आठवीत चार चौघींच्यापुढे उगीचच—

हौस मला मोठी बंधूसंगट बाजाराची
भैनीच्या ग चोळीसाठी कंठी मोडली हजाराची

असला टेंभा मिरवावा !...खरंच की ?

पण जिवाची अशी खोटी खोटी समजूत तरी किती घालावी न् कुठंवर ? धरणीमातेनं आसुसल्या मनानं चैत्र-वैशाखात पावसाची वाट बघावी, त्या रीतीनं माहेराची वाट पाहायला शिकतेल्या मी अशा वेळी आपलेच ओठ न् आपलेच दात, तर रागावायचं कुणावर या कल्पनेनं स्वतःशीच लाख वेळा म्हणावं—

माझे की आयुष्य कमी करूनी मारूती
घाल शंभर पुरती भाईराया

आणि त्याच्या सुखाची अपेक्षा करावी. जनलोकात आमचा हा जिव्हाळा जाहीर करीत न बसताना, फार बोलण्यानंच दृष्ट होईल या धास्तीनं न् अंतरीच्या लोभाची एकसारखी घुसळण घालीत आपल्याशीच सुखदुःखाचं बोलत बसावं या कल्पनेनं मी वारंवार गुंफा घालावा आणि मग—

घागऱ्या घुळुघुळू दणाणीला माझा सोपा
खेळतो प्राणसखा भाईराया

बंधू राजस बाई खेळे अंगण झालं थोडं
लावीयीली फुलझाडं मामारायांनी

बाळपणीच्या या आठवणी घोळवीत तास न् तास बसावं. एवढंच नाहीतर जाईमोगऱ्याचं, गुलाबचाफ्याचं, जिवाभावाचं आणि काळजाचं अंथरूण घालून मोत्यांनी गुंफलेल्या पाळण्यात जोजवलेल्या ह्या सावळ्या सुरतीचा आलाबला घेताना—

एका मागं एक नको येऊसा दुडदुडा
माळ्याच्या मळ्यामंदी येसुबंदू हाई थोडा

आजीनं ह्याच्या इष्टमित्रांना बघून याला पोटाशी घेत म्हटलेलं आठवीत त्याच समाधानाची कारंजी आता पण वारं प्याल्यागत झालेल्या नजरेला बघू द्यावीत, आणि मग—

आमी चौघी भैनी एका ग गोठणीच्या
चोळ्या शिवा पैठणीच्या भाऊराया

असलं काही मनी योजावं. घरातल्या मायमाऊलीला, द्वारकेला, तसला सांगावा धाडावा....मनाजोगी शाल घेऊन, पालखीत बसवून, सोन्याची साखळी आणून, भाऊबीजेची तयारी केल्यावर शेजीराणीजवळ—

हात भरला काकणानं कान भरले कापानं
ताटी घालीतो मोतीपवळी बंधुरासज हावसेनं

असली गोष्ट करायला मिळावी ही मेली किती हौस माझ्या जिवाची ? म्हणून आमच्या आईनं देखील—

चांदण्यासंगट जशी चांदाला येती शोभा
भैनीच्या मेळाव्यात भाऊ राहीला ग उभा

दिल्यानं घेतल्यानं न्हाई पुरत ऐरावती
बंधु राजसाची सये गोड बोलाची रसवंती

धन ती संपदा ग पडे सांदीच्या सुगडात
बंधुजी राजस माझे हंडे दिसती उजेडात

आमच्या मामारायांच्याबद्दल असलं बोलणं करीत आमची तहानभूक हरपून टाकावी ती ! खरं ना ? तर आम्हाला पण हे नवल विकायची दांडगी हौस. म्हणताना एक दिवस काय झालं की, घोळ्यामेळ्यानं आम्ही आमच्या मळीच्या छपरात आलेलो. भैनीभावंडांचा चोखामेळा आईसमोर बसलेला. गूळशेंगा पुढ्यात आलेल्या. सालपापड्या भाजून मातामावली देतेली. तशी कशावरून तरी निघालेलं आणि ती एकदम हुंदक्यानं दाटतेली बोलली कशी—

“ एकदा काय झालं की, एक भैन आपल्या भावाला भेटायला गेली. काय ? गेली तर भाऊ गेलता शेतावर. भावजय घरात एकली. तर ये बस काय म्हनील का न्हाई ? न्हाईबा ! छे ! उलट “ का येणं केलं जी ? ” असं विचारून हिनं एक फडकं घेतलं. फाटकं तुटकं बोतार घालून बस दिकुन म्हटली न्हाई. अंहं ! तशी त्या भैनीला झालं खुळ्यागत. न्हवं, बस म्हणीना तर बसतीया कुठली ? आपली वळचणीखाली राहिली तशीच उभी. शाप हिनं पण हाळी दिली न्हाई का भाईर आली न्हाई ! भैन बिचारी मोरागत मनी झुरली न् आता माघारी वळणार तर तेवढ्यात भावजय म्हणणारणीनं एक गाठुडं आणून हिच्याजवळ दिलं न् जावा म्हटली आल्या वाटेनं थेट !...आता ? मग ही मनात काय ते उमजली न् गेली. तर हिची काय समजूत की, वाटेला भाकरीतुकडा खायाला दिला असंल. म्हणून काखेचं पोरगं लईच खळीला आलं तशी ती एका झाडाखाली वाटेत बसली. काय ? वाटेत बसली न् गाठोडं सोडून बघतीया तर आत शेणकूटं?...

" अरं माझ्या देवा ?" पोरगीनं ह्यो हंबरडा फोडला. पण लई वाढूळ रडतीया कुणाची ? न्हवं डोळं पुसाय ह्रुतंच कोण जवळ तवा रडणार ? मग उठली चांगली गजबारानं न् लागली वाटेला. तितक्यात काय झालं की, शंकर-पारबतीचं इमान तिथनं चालल्यालं. पारबतीचं हुरदं भरून आलं, ती शेणकुटं बघून ! म्हटली कशी, हिचं भलं होऊ दे न् त्या शेणकुटाचा केला सोन्याचा लाटा ! मजी मा म्हायार झालं गा सजागती ! काय ? सजागतीच ही गोष्ट घडून गेली न् ह्या खुळीला घरला गेल्याव त्याच गाठोड्यात सोन्याच्या लाव्यांचं दर्शन घडलं !....त्यासरशी ही गेली हाडब-डून. तंवर तिकडून तिचा भाऊ आला न् दोघंबी मग गळ्याला पडून रडली म्हणीनासा. पावसानं भरल्याला ढग अस्मानी फुटावा तसं दोघांचं डोळं गळलं ! तर बो ?....तर माजं काय म्हणणं की, भैन भावांडांनी झगडा करूनी. एकमेकांच्या मर्जीमाप न्हावावं. पोरीहो, असल्या भावजा होऊ नगासा न् ल्येका तू पण बायकूचं वाईट वंगाळ चालू देऊ नगंस ! एका कुशीतलं तुमी माणीकमोती, त्यात फरक नको...."

तर त्या गोष्टीची प्रचीती आम्ही कशाला येऊन द्यावी ? म्हणून आमचं पण लिडी लिडी उगाच माहेरी जाणं नाहीच कारणाशिवाय. अंहं ! बया-बाईचं हे तान्हं दिवाळीला भाऊबीजेच्या दिवशी ओवाळलं की, लकाल्ट झाली म्हणून आमची खुशी. या उप्पर—

आई तंवर माहेर बाप तंवर माझी सत्ता
नको बोलूस दशरथा भाऊराया

असलं बोलायची वेळ आणावीच कशाला मी म्हणते ? कारण-—

नऊ मास होते मायबाईच्या उदरी
आता मी परघरी लोकं झाले

याची मला पक्की जाणीव होती. म्हणून कधीतरी, कुठंतरी, केव्हातरी,

आपण गुज बोलू डाळिंबी समान
तू भाऊ मी बहीण दादाराया

या सुखाची वाट बघावी एवढीच माझी आशा आणि सांगायचं तर—

सुभान संतूबाई तुझी न्हाणी झुडकली
हिरकणी सापडली चंद्राबाई

आपल्याएकी त्याच्या मनात एवढी प्रीत उभी राहावी असं आपण वागावं एवढंच माझं म्हणणं. म्हणूनच त्याचं लगीन करायची गोष्ट घरात निघाल्या बरोबर माझ्या भावजईच्या चुड्यामागची ही पाटली हारखून टुम्म झाली ! वाटलं, की देखणी वहिनी घरी येऊ दे आणि पाहिजे तर—

नेत्रीचे अंजन हाताची लेखणी
पत्रिका रुक्मिणी लिहितसे

लिहूनी पत्रिका देऊ कोणा हाती
यावे रातोराती यादवराया

येऊनी उतरावे अंबीकेच्या स्थळी
शिणगार पाठवावा रुक्मिणीसी...

असला डामडौल आमच्या माहेरी येऊंदे अस्सं वाटलं अगदी !....

आकाशीच्या चंद्राला वधू हवी होती तशी माझ्या ह्या चंद्रहाराला पण बायको पाहिजे होती. त्या चंद्रानं सविताची कन्या सूर्या हिच्याशी लगीन केलं. त्यावेळी मनाच्या रथावर बसून ती चंद्राकडे गेली. पतीच्या अमृतमय घरी जाताना तिला ते घर मांगल्यानं भरून टाक असा आशीर्वाद देण्यात आला. त्याप्रमाणं माझ्या माहेरच्या चंद्राला आमच्या मामांची राधिका करायची हे कळल्याबरोबरच मी बोलून गेले, "बाई ग, ह्या घरातील मंडळी भारी चांगली आहेत. सदाचरणी आहेत. तरी भिऊ नकोस. तुझ्या पतिदेवाच्या सहवासात तू सुखरूप राहशील इथं."

खरंच, “ ह्या राधिकेच्या कारणानं आमच्या माहेरघरची भरभराट व्हावी मुलाबाळांनी घर नांदतं असावं. आल्यागेल्यांशी व घरच्यांशी हिनं प्रेमानं रहावं. नवऱ्याशी मिळतंजुळतं घेऊन जन्मभर तिनं त्याचं पालणपोषण करावं. उत्तम प्रकारचं मार्गदर्शन त्याला करून स्वतः खरी खरी गृहिणी व्हावं. ” अशी माझी इच्छा हं ! म्हणून—

माझ्या चुडेयाचं सोनं सये आहे सुरतेचं
वडिलांच्या पारखेचं बाप्पाजींच्या

माझ्या चुडेयाचं सोनं आहे ते नाजुक
फूल वाहिलं साजूक गणपतीला

माझ्या चुडेयाचं सोनं केवड्याचं पान
घेणाऱ्याला लिंबलोण बाप्पाजींना

राधिकेनं असं अभिमानानं बोलून माझ्या बंधुजीची बडेजाई सांगावी अशी माझी हौस. खुळी म्हणा पाहिजे तर मग मला ! इथं आमच्या घरात सगळं ढिगानं असलं तरी उठता बसता आईच्या न् बाबांच्या सईनं जीव खुळा-भैरा होतो. वाटतं की—

बाप्पाजी समींदर बया मालन व्हाती गंगा
दोघांच्या सावलीत कर आंगूळ शिरीगंगा

असं ह्या प्रेमाच्या सागराला सांगून टाकावं आणि घरात आबादी आबाद नांदव म्हणावं ! नाही तर—

वहिनीबाई भावजई तुझं बोलणं धसाफसा
माझा कल्याणी आरसा भाऊराया

वहिनीबाई भावजई तुमचं बोलणं शिडीफिडी
माझी पाटावाची घडी भाऊराया

वहिनीबाई भावजई तुझं बोलणं अगं जागं
माझा पेटाऱ्याचा नाग भाऊराया

ह्या राधाराणीपुढं पाया पडून असं बोलायची वेळ आल्यावर राहिलंच काय कुळशीळाचं धडपणी मग ? छे ग बाई ! असं नाहीच व्हावं कधी. चोळीच्या आशेनं जातंयच कोण ह्यांच्याकडे तेव्हा आम्हाला पाहिल्या-बरोबर पायानं पाट हिनं सारावा आणि डोळे मोडीत आमचा अपमान करावा ? काय म्हणून ? आम्ही कोणीच नव्हेत का हिच्या ?

हजाराचा घोडा पन्नासाची झूल
वरी गुलाबाचं फूल भाऊराया

हजाराचा घोडा पन्नासाचा चाबूक
बसणारा ग नाजूक भाऊराया

घोड्याला घासदाणा देते बदाम कुटून
आला परगणा लुटून भाऊराया

ह्या भावनेनं आमचं जोपासलेलं मन हिला नाही कळू ? कळलंच पाहिजे. त्याखेरीज—

बारीक बांगडी कशी भरू मी एकटी
घरी भैन धाकुटी येश्वदाबाई

आम्ही बहिणीबहिणींनी तरी या रीतीनं वागावं कुणाच्या जिवावर ? हिरव्या शाळूच्या, लेकी थोरांच्या, बुगडया मोराच्या, भैनी भावाच्या असलं आम्ही बोलावं तरी कुणाच्या तालेवारीवर मग ? म्हणून—

ठुशी टिक्काखाली सरी घालावी कवा बवा
तुझा दागिना नित्य नवा राधाराणी

ठुशी टिक्काखाली सरीबाईचा आकडा
मधी ताईत वाकडा राधिकेचा

ठुशी टिक्काखाली सरीबाई तू जामीन
हावशा कांताची कामीन राधा सई

ह्या भावजईला मी आपली अशी खुलवीन आणि साता नवसाच्या ह्या चांदाला नीट सांभाळ म्हणीन. सूपभर लाह्यांत एकच रुपया दिसावा त्याप्रमाणं चांदण्यातल्या चंद्राला येणारी शोभा आम्हा चौघी-पाचजणींतल्या या राजाला येते. तर हिनं—

दे रे देवा मला बहिणीसारखी नणंद
कमळी गोविंद पूजीयेला
दे रे देवा मला आईसारखी सासूबाई
कमळी अंबाबाई पूजीयेली
दे रे देवा मला बापासारखा सासरा
कंठ्याखाली तो दुसरा चंद्रहार
दे रे देवा मला भावासारखा तो दीर
कमळी रघुवीर पूजीयेला

असली मागणी देवाजवळ करावी अशातली गोष्ट नाहीच. आमची सगळी माणसं चांगली आहेत. त्यामुळं ह्या चाफेकळीच्या काळजीचा प्रश्न प्रश्न उद्भवतच नाही असं आमचं म्हणणं. आमच्या मामींना ह्या तोळ-बंदीचा भोवरा उगीच पसंत पडला काय मग ? सगळं ध्यानात घेतल्या-शिवाय ? अगोबाई ! मामींची फार चौकशी आणि दांडगी ऐट. म्हणून आमचे हे बंधुराज मामी जेवायच्यात म्हणून कळलं तरी—

तीनशेसाठ भाज्या मेथी नाही आज केली
माझ्याकडून गोष्ट गेली भाऊराया

असं बोलायची आमच्यावर वेळ आणतील !....शप्पथ ! कारण ह्याला पण मामींचा फार सोस. तशातून—

तीनशेसाठ भाज्या जवे दोरे मी सारिते
भावांना वाढीते साखरभात

आमच्या आईचं हे कवतिक मामीला ठाऊक. म्हणून सासुरवाडीला आमचे हे दादाराया असे भुळून जातील, आणि राधिका पण तिकडचीच ओढ अशी ठेवील की एखादे वेळी—

वाटेवरचं घरदार आल्यागेल्यांला ताकभात
भल्या बापाचं नाव राख भाऊराया

असं म्हणायची वेळ आमच्यावर यायची ! तर हिरव्या सतरंजीवर बसून पंचरंगी चुडा लेणाऱ्या राधिकेला पण मी सांगून टाकीन की, आमच्या घरात—

लाडक्या भाचीचं गोडसं ग जेवण
दुधाला विरजण साखरेचं

तुझा हा डामडौल कधीचाच आहे तर तू आपली—

घोडी खिंकाळली माझा जीव किती भ्याला
सखा केवढ्या रात्री आला भाऊराया

असली वेळ तुझ्या भाऊरायावर येईल असा सांगावा धाडायचाच नाहीस मुळी ! अंहं ! आणि मुख्य म्हणजे—

माझ्या दारावरनं गेला माझ्या घरी नाही आला
माझा अपमान झाला भाऊराया

अशातली गोष्ट तू आमच्याएकी घडवून आणू नकोस. आणि उठताबसत ज्याच्या त्याच्याजवळ—

माझं घर थोर केर लोटता लोटताना
सभा बैसली उठेना सासूबाईची

असली कुरकूर पण करायची नाही. आमच्या बाप्पाजींचं घर वर्दळीचं

आल्यागेल्यांचं. ऊठबशीचं. तर तिथं ये–जा व्हायचीच कुणा नाही कुणाची तरी. त्यातून आमचे बंधुराज भाग्यवंत. त्यांच्या इष्टमित्रांची फौज दांडगी. म्हणून तर हिनं—

हे बाई थोरलं माझं घर हंड्या गल्लास लोंबत्याती
सासूबाईचं बाळराज धनी वाड्याला सोबत्याती

गोड भरताराचं सुख सये सांगता सांगता
भर दिवसा डोलला बाई सूर्व्या पाणी पिता

हा अभिमान पदरी बाळगावा आणि आमच्या माहेरचा नावलौकिक वाढवावा. त्यातून मग कधी तरी—

माडीवर ग माडी चढती सासर मांमाजीची
उभी राहुनी पाहते ग लंका तिथून माहेराची

तिनं हा पण थाटमाट केला तरी आमचं काही म्हणजे काही एक म्हणणं नाही. उलट—

उभा तो रेवो बड़तले
पूछो म्हारे मनड़े री बात
काई कहे छे वीरा मावडी
काई कहे गावा रा लोग

( भाऊ वडाच्या झाडाखाली उभा आहे. बहीण आपल्या माणसांची व गावाची विचारपूस करते आहे. शिवाय तिला हेही हवे आहे की कोण कोण काय म्हणते आहे. )

काई करी म्हारी मायजी
काई सहल्यो रे साथ

( माझी आई काय बरं करते आहे ? आपल्या मैत्रिणींच्या मेळ्यात तर बसलेली नाही ? )

माई तो काते बाई कातणों
बाद बनावे थारे रंग चूनरी

( अग, आई सूत काढीत बसली आहे. नंतर तुझ्यासाठी चुनरी तयार करण्याचा तिचा विचार आहे. )

भावज जायो ए बाई डीकरो
घरघर गावे ए बधावणां

( भावजईला मुलगा झाला आहे आणि घरघरांतून आनंद व्यक्त होतो आहे. ) यापरीच्या सुखसंवादाचा आनंद तिनं आपल्या भावाच्या भेटीत पोटभर लुटला तरी देखील आमची मुळीच ना नाही. आम्हाला जे हवं तेच तिलाही पाहिजे हे आम्ही का लक्षात घेऊ नये ? घेतलंच पाहिजे. त्यामुळं—

माझ्या ग दारावरनं हिरव्या पंखाचा राघु गेला
सांगते बंधु तुला त्याच रंगाची चोळी मला

तिची—आमची ही असोशी एकसारखीच. म्हणून आम्ही नणंदाभावजयांनी

तुझा माझा भाऊपणा ताट शाळूचं वाढीलं
सोन्याची पानपोत बिरडं मोत्याचं लाविलं

अशा थाटात जगायला पाहिजे. दुजा भाव जसा नकोच मेला इथं तिथं डोकं वर करून यायला ! त्यासाठी—

मागं भरले गोठतोडे पुढं भरले ग छंद
बंधूजी दारी आले करा धिंगाणा तुमी बंद

हे पण तिचं आमचं एकाच सुरात घुमलं पाहिजे. नाही तर—

ज्याला न्हाई भैन त्येला पाटंचा पार सुना
बंदवाला माझ्या ववी गाते मी अर्जुना

या एका सुखाशिवाय सारं सप्तपाताळात जमा व्हायला काय वेळ ? आणि वेळप्रसंगी—

भैनीला दिलं नको म्हणूस नासलं
लाडक्या बाळराजा तुजं दुणीनं साचेल

आमच्या आईला देखील हे बोलायची वेळ यावीच काय म्हणून मी म्हणते ? सुखाबरोबर दु:खही मग उचंबळतं न् सारा घंग्राघोळ उडून जातो. खुळ्यागत ही रंभा घरात धुसपूस मांडीन म्हणेल तर मग—

सावळी सुरत धोतर वाळतं दोरीला
बंदवाच्या माज्या येड लागलं नारीला

नको ती ही पीडा घरात घुसेल न् सुखाचा पार सप्पा होऊ जाईल ! नको रे देवा तसं व्हायला. उलट आमच्या आईनं—

भाची केली सून झाडू देईना अंगण
बंदवानी माज्या दासी दिल्यात्या आंदण

असं केलंय हे सांगायला आमची आनंदानं तयारी आहे. देवाशपथ त्या सुखात आम्ही नणंदेच्या तोऱ्यानं बिब्बा घालणार नाही ! आमची जातच नव्हे ती. कारण बोलूनचालून मामारायांची ही लाडकी लेक. शिवाय "ताग तागाची, मिशी वाघाची, लेक मामाची" असा तिच्या एकी आमचाच रुबाब. तर मग नणंद पावणी आली म्हणून फाटकं बोतर घेऊन पाहिजे तर बसूंदे असं तिनं म्हणावं ही वेळच यायची नाही ! फार फार तर—

पडलं टिप्पूर चांदणं
भावज दिवा लाव ग
नणंद निघाली सासऱ्या
काय ते आंदन द्यावं ग
दीन म्हणालं विसाचं
देण्याजोगं न्हाय ग...

झिम्मा खेळताना असली गंमत चेष्टेखातर कुणी केली तरी एकवेळ चालेल पण—

ताक करताना रवीबारडी तोलयीना
लाकडी लेकबाळ गौळण घामेली बोलयीना

अशी वेळ आल्यावर आम्ही पुढं होऊन तिचं काम उचलणारच.

आता दैवगतीप्रमाणं आमच्यापैकी कुणाच्या घरी गरीबश्रीमंतीचा फेर पडलाच तर उणंदुणं मेलं निघायचंही नाही. आणि...तशी ती वेळ आम्ही येऊन पण देणार नाही ! अंहं ! कारण—

नको धन नको मुद्रा नको मोतीयांचे हार
देई प्रेमाश्रूंची धार भाईराया

ही आमची मनापासूनची भावना. त्यामुळं आभाळाला जसा आपला रंग बदलता येत नाही, चंद्राला जसं तापता येत नाही न् सोनं जसं कधी कुजत नाही, त्याप्रमाणं भाऊ बहिणीवर रुसणार नाही या बद्दलची आम्हाला खात्री म्हणूनच—

अशी कापली करंगळी बोटा लागली ग रुद्रधार
कशी पाठीशी सुभद्रा चिंधी हुडकिती सव्वा पार
द्रौपदीबाईनं ग नवा फाडिला पितांबर

माता रुक्मीन बोलयीती देवा तुमाला भैनी किती
कशी पाठीची सुभद्रा ती का जोडीली दुरपती

सख्ख्या आणि मानलेल्या बहिणीभावांत जिथं देवानंही फरक केला नाही तिथं आम्ही तरी कशाला करावा ?

मानीयला भाऊ जातीचा मुसलमान
सख्ख्या भावा ग परीस त्याचं लई ते इमान

असल्या अपूर्वाईनं आमचं घर उजळून निघालेलं, तिथं सख्ख्या भावाच्या-एकी आणखीनच माया असावी हे उघड आहे. जिथं आपल्या रुमालाची चोळी शिवून भाऊबीजेचं वचन राखणारा बंधुराजस आमच्या मामांच्या रूपानं घरी नांदतो आहे तिथं—

बंधूजी पाव्हणा शेजी म्हणीती कोण राजा
शेजीला किती सांगू राजा न्हवं तो बंधु माजा

हेही आम्ही आमच्या डोळ्यांनी पाहिलंय न् कानांनी ऐकलंय. त्या कारणानं आम्ही एक वेळ पोटचं सोडू पण पाठचं नाही सोडणार हा आमचा निर्धार अगदी आज्जीनं सांगितलेल्या त्या कहाणीगत ! थेट तोच तोंडावळा आमच्याही भावनेचा...

"....आईला सबुद दिला मजी दिला. बाळंतपनात आई मेली तर लेकीनं आपल्या हरीसंगं ह्यो श्रीरंग भाऊ दिकुन संबाळला. एक एका थानाला तर दुसरा दुसऱ्या थानाला पाजून तिनं हाताचा पाळणा केला. नेत्राचं दिवं लावून काळजाचं हातरूण केलं. पन नवऱ्याला हे सुक बगवंना म्हनताना त्येनं नदीला परडी सोडून पाठचं वहायचा नवस केला...

"....झालं ! भैन मनातनं चरकली. काय ते तिनं वळीकलं. बराय म्हटली न् तिनं परडीसाठी पोळ्याचा निवद केला. कणकीचं दिवं लावलं. पाच मुटकं केलं. परडी भरली. पानफूल वाहिलं. हळदकुंकू लावलं. आणि

शेल्यानं पोरगं पोटाला न् भाऊ पाठीला बांधून निगाली...जिवाचा धडा केला. नदीवर आली. त्यासरशी दुई दुई अंग पाना दाटून आला. दुधाची कारंजी उसळली...मन घट्ट करून हिनं लेकाला कडकडून मिठी मारली. मुका घेतला. आलाबला घेतली. पोटभर पाजलं न् डोळ्यांचं पातं लवतंय न लवतंय इतक्यात पाठचा भाऊ पोटाला न् पोटचं पोर पाठीला घेतलं !

"....पाणी पायाला लागलं मातूर जीव गेला उडून राणीचा...पण भ्याली नाही. माघारी वळली नाही. तडक कमरेइतक्या पाण्यात गेली. डोईवरचा परडीचा भार नदीत सोडला न् आपली कूस पुना उजूंदे, घरात पाळणा हलूंदे, आसलं नदीजवळ मागणं करीत हिनं पोटचं वाहिलं नदीला !...

" ....सखुबाई साजणी घाम्याघुम्म झाली. भावाला घेऊन घरला आली...

"...होता होता हिला चार पोरं झाली न् एक रोज घरात थोरल्याचं लगीन निगालं तशी हिनं भावावरनं गीतं गायिली, हळद दळताना हं ! तर नवरा कसा म्हणतो, " अग अग ! लेकाचं लगीन न् भावावनं गीतं कशी ग ? मग हिनं खरी गोष्ट सांगितली. त्यासरशी नवऱ्याचं पित्त उसळलं न् त्येनं दिली की हिला घराभाईर हाकलून !....आता ? पण ही बहाद्दुरीन घाबरली न्हाई का हाडबडली दिकुन न्हाई....भावाला संगं घेऊन गेली न् त्येचं झोकात लगीन लावलं...आईला दिल्याला सबूद पाळला न् माहेरचा कुलदीप वाढवला...."

आम्ही पण याच जिद्दीनं आमच्या भावाला सांभाळू. मग एकडाव रत्नजडित करंड्याला झाकण लावीत हळदकुंकू देताघेताना देवापाशी ह्याला राखण मागितली अगर...

माझ्या मरणाच्या येळी भाऊ माझा ग नव्हता
चोळी लुगड्याची घडी फिरे आगीनी भवता

असला प्रसंग आला तरी मायेची ताटातूट व्हायचीच नाही. एकाच

कुशीतल्या शिंपल्यातले मोती आम्ही, तर कशाला ह्या माहेरच्या जहाजाला दृष्ट लावावी कुणी ? नाही होणार तसं. उलट—

सर्ज्याची नथ लेकी पराण पेरीला
सोन्याची कडीतोडी माझ्या नवसाच्या हरीला

आमच्या आईनं ही तालेवारी केली तरीही—

चौघी आमी भैनी एकमेकींच्या चालणीच्या
सया ग म्हणीती लेकी कुणा ग मालणीच्या

आमचं कुळशील आम्ही असं राखू. आणि घरात—

हिरव्या चोळीनं दंड करीतो रसारसा
हावशा कांतानं छंद पुरवीला व्हवा तसा

असली हौसमौज असली तरीसुद्धा—

लाडक्या लेकीचं नाव ठेवील हरूतारू
ताईता बंदू माज्या हौसदारा तू हाळी मारू
गावाला गेला म्हणू माझ्या गळीचा चंद्रहार
ताईता बंदू माजा कधी बघीन डोळाभर

हाच अभिमान आम्ही पदरी बाळगू आणि घरी अवचित आलेल्या चंद्राला पाची पक्वान्नांचं ताट तयार करावं म्हणून जात्यावरून उठताना—

सरलं दळीयानं उरलं सुरलं कुठं ठेवू
माझ्या तू बंधुराया ऊठ बळताला शिडी लावू

असलं गीत गाऊन घरच्या वासाच्या तांदळानं भरलेल्या उतरंडी उतरायला पुढं होऊ. मग बरीक घरात कितीही सासुरवास असला तरीही ही राधा त्याएकी कोयाळ बोलून झुरायची नाही का रडायची पण नाही. उलट

वासाचे तांदूळ रांधीत घरच्या माणसांना सांगून टाकील की—

पंचमीच्या सणायाला
बंधू आल्याती निययाला
जाऊ काय जी म्हायारी
नागारपंचीम खेळायाला
जाते मी म्हायारी...

अशावेळी मग जर का सासूबाईनी तपकीर वडता वडता—

कारल्याचं आळं लाव ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा...

असलं द्वाडपणाचं बोलणं करीत लांबड लावली तर मात्र मुळीच ऐकणार नाही. दादारायांच्या बरोबर जाईन तरच नावची. माझा हा चंद्र उगाचच हिरमुसला न् कोमेजला म्हणजे मग ? ह्या अमृताच्या सागराला त्याचे फूल झेले न कोमेजता सुखात ठेवावा आणि—

येरे येरे भाऊ किती झाले दडपण
कधी हृदय उघडीन तुझ्यापुढे

अस्सं म्हणीत त्याच्यापुढं मनी दाटदुटल्या गुजाचा झाडा करावा हे चांगलं नाही का ? त्याशिवाय—

दुपारचे ऊन घाटीडोंगर कोण घेतो
बहिणीसाठी भाऊ येतो भाऊबीजे

या गोष्टीचं चीज व्हावंच कसं देवा ?

ताईला पाहून हरेल सारा शीण
भावाला बहीण अमृताची

या गोष्टीची प्रचीती यावी म्हणून तर फार दिवस गाठभेट नाही. त्यामुळं मी—

अरे वाऱ्या वाऱ्या धावशी लांब लांब
बहिणीचा निरोप सांग भाईरायाला
कावळ्या कावळ्या लांब जाई रे उडून
येई निरोप सांगून भाईरायाला
दाणे मी घालते तुम्हाला ग अंगणात
भावाची आणा मात चिमण्यांनो
नाही हाकलीले कधी अंगणामधून
यावे निरोप घेऊन भाईरायाचा

या उलाघालीनं शिणून गेले...वाटलं की, कुणाजवळही...

भावा ग बहिणीच्या प्रेमाला नाही सरी
गंगेच्या पाण्यापरी पवित्रता

या सुखाचा भंग होऊ नये म्हणून मनातली गोष्ट वाऱ्यावर न् पाखरांवर सोडून मोकळी झाले. त्याचं सार्थक झालं. भाऊ माझा आला. उदार हाताचा, खंबीर मनाचा आणि गंभीर गुणाचा असा प्रेमळ भाऊ माझा. तर आता असंच करते बाई—

अंतरीचं गुज तुला सांगते एकल्याला
पाठीच्या रतनाला बंधूजी धाकल्याला

त्याशिवाय माझा मनमोर आनंदानं डुलायचाच नाही तर? उगाच खोटं कशी बोलू?

■

# ३



# तीर्थांचे सागर

सासरमाहेरच्या गोष्टी करत त्या दिवशी रुक्मिणी आमच्याजवळ घटकाभर बसलीवती. म्हणताना तिनं कोणत्या तेगाऱ्यानं हे बोलणं करावं याचा अंदाज मी आपल्या मनाशी घेत बसलेवते. माझ्या मनी त्या घटकेला गंगेच्या धारेला चमकणाऱ्या पवित्र हिऱ्यागत आणि सागराप्रमाणं पोटात मायेचा साठव करणाऱ्या देसाई नानारायागत वडील घोळतेले. आणि त्रिवेणीचं गोड दूध देणाऱ्या हळदीच्या वेलागत दिसतेल्या आईएकी बेलफूल, तुळशीपान, नारळी असल्या उपमा खेळतेल्या. तर चंदनासारख्या बाप्पाजींच्या आणि गोधनासारख्या मातामाऊलीच्या सावलीत बसून ह्या रुक्मिणी सुंदरीनं द्रौपदीच्या थाळीगत सरता सरू नये असं बोलणं करावं अशी माझी कल्पना. म्हणून एखाद्या लेंडोरीला पूर आल्यावर तिनं भदाभदा वाजत नर्मदेशी चढाओढ करावी त्याप्रमाणं सगळ्यांच्या वरचढ हिनं बोलावं अशी मी आपल्या मनाशी खूणगाठ बांधली आणि काशीविश्वेश्वरांच्या या अमरावती बनात सावलीला बसून बाळपणी आईनं दिलेला अमृताचा पान्हा जिभेवर घोळवीत मी आपल्या कवतिकाच्या गोण्या उसवल्या. त्या नादात मी आपल्या टोपपदरी पदराचा बंदोबस्त केला न् ही नाजुक नार काय बोलतेय ते नीट कान देऊन ऐकावं म्हटलं.

तशी मग रुक्मिणीनं म्हटलं कसं, " काय सांगू गडणी माझा डाम-

डौल ! अग, माझ्या जोडव्याला साडेतीनशे मोती गुंफलेत न् बांगडीला एक लाख चंद्रज्योती जडविल्यात ! शप्पथ ! विठूरायाच्या नगरीला भारूं-भार सोन्याचा कळस आहे न् त्यांच्या पगडीच्या तुऱ्याला नऊलाख मोत्यांचा गुंफा केलाय ! रत्नजडित-चंद्रहारानं माझी मान वाकलीय न् माझ्या घराला फुलांची कवलं बसवलीत ! गवंडीदादा न् सोनारदादा आळसावलेत काम करून -करून एवढ्या हिऱ्यामाणकांची जडणघडण राऊळाच्या कळसावर झालीय ! उगीच नाही ?" ते ऐकून तिच्या पित्या दौलताला कवतीक वाटलं. त्याच्या पोटात तिच्या एकीची माया दाटली न् तो भिम्मकराजा बोलला कसा, "बाळ, मी तुला समींदर आंदण दिलाय !" त्यासरशी आमचं सगळ्यांचं मन मोहरलं न् अंगावर मूठभर मास चढलं. म्हणताना या मायेनं गहिवरलेल्या माझ्यासारख्या लेकीबाळीनं चटदिशी बोलणं केलं की—

फुलामंदी फूल सये उत्तम चाफ्यायाचं
सुख भोगावं पित्यायाचं

त्यासरशी लाखमोलाच्या करवंदी मोत्यांची नथ ल्यालेल्या रुक्मिणीनं हसत-मुखानं मान वर केली. पैस मैदान बघून पंढरी वसवून दिलेल्या आणि हळदकुंकवाला म्हणून आळंदी लिहून दिलेल्या बाप्पाजींकडं तिनं अभि-मानानं पाहिलं. त्यावेळी जडभारीतोड्यांनी वाकलेल्या तिच्या कोवळ्या हातातील बांगड्या चमकल्या आणि तोडीच्या वाक्यांनी शोभणाऱ्या दंडभूजा सावरीत तिनं त्यांना नमस्कार घातला. तशी तिच्या बाप्पाजींनी तिला गाढ आलिंगन दिलं न् ती पण सुन्दरी हसतमुखानं बोलली कशी—

जाईन माहेरी बाप्पाजींच्या घरा
घुसळीन डेरा अमृताचा

हे ऐकून भिमकराजांचा जीव एवढा झाला. त्यांच्या तोंडावर आनंदाचा मळा फुलला. त्यांचं क्षात्रतेज समाधानानं असं न्हाऊन उठलं की—

आकाशात तारे त्यांचे ओठ का हालती
संगीत गाणी गाती बाळराजा

हा देखावाच नजरेनं पारखून घ्यावा. तर तो आनंद बघून आमच्या पण आनंदाला उधाण आलं. आणि सांगायचं म्हणजे आम्हाला बघून—

थुईथुई उडे का ग कारंजे उसळे
तुझ्यामुळे उचंबळे तान्ह्या बाळा

या भावनेनं आम्हाला पोटाशी धरणाऱ्या आमच्या आईपाशी आम्ही मनानं केव्हाच जाऊन बसलो ! तिनं बाळपणापासून आमचे केलेलं कवतीक आमच्या मनात घोळायला लागलं आणि आम्ही खुळ्यागत—

सीतळ सावलीला मी का उतरीते वज्जं
विसाव्याचं झाड माझं मायबाई

असं बडबडत आईचा पदर श्रीमुखावर ओढला ! त्यासरशी त्या मायेच्या उबेनं आमची तहानभूक हरपली न् आईच्या कुशीत शिरत आम्ही तिला बजावलं कसं--

आई नको धाडू कधी दुसऱ्याच्या घरी
बये तुझ्या ग हातची गोड कोरडी भाकरी

म्हणताना मग आमच्या तोंडावर भावनांचा मळा फुलला आणि आमचे नेत्र—

काजवे फुलले फुलले लाखलाख
पहाया श्रीमुख तान्हीयाचं

हे सृष्टिसौंदर्य टिपून घेत समाधानानं न्हाऊन उठले...आम्हाला बघून आईच्या नेत्रांची तृप्ती झाली. आणि आमच्या तान्हुल्यांच्या दर्शनानं आम्ही

धन्य झालो ! त्या वेळी असा आनंद झाला की, माहेरच्या अंगणात जाऊन पोटभर खेळावं असा मोह झाला...वयाचं भान उरलंच नाही जणू ! स्थळकाळही लक्षात आला नाही. म्हणताना आपल्या उंच सुरांनी गात आम्ही माहेरघरच्या निरशा दुधाच्या घागरी मनानंच भरल्या देखील आणि सडा रांगोळी करून धरित्रीला आळवीत म्हटलं कसं——

कापूस सूताच्यो वाती येद्यो वळीयाले वाती येद्यो
वळीयाले वाती येद्यो
धरतरी मायेच्या हाती येद्यो पाचा वातीचा दिवा येद्यो
पाचा वातीचा दिवा येद्यो
वळी वाये वळी येद्यो हळदीच्यो वळी येद्यो
हळदीच्यो वळी येद्यो
धरतरीमाते वळी येद्यो खेळांक आमकां मळी येद्यो
खेळांक आमकां मळी येद्यो ''

माहेरी जायचं मनात यायचा अवकाश की, लेकी सुंदरीचं आमचं मन हारखून टुम्म होतं. मनाचा पारवा भल्या पहाटेचाच घुमायला लागतो आणि वाऱ्याचे पंख लावून मन केव्हाच आईकडे जाऊन पोहोचतं देखील !...अशा वेळी त्याला पाखराचे पाय फुटतात अन् ते चिरेबंदी वाड्याच्या कमानी दरवाज्यावर जाऊन उतरतं. तुझ्या माहेरची वाट कोणती ग ? असा प्रश्न कुणी जर या धांदलीत केलाच तर——

माहेराची वाट कोण पुसती येसवदा
माडी दिसं कळसासुद्धा

असं उत्तर हे गुंजावणी डोळ्यांचं पाखरू देऊन मोकळं होतं, आणि मग आपल्या भावनेला दृष्ट लागू नये म्हणून लगेच——

कामा मागं कामं किती लावावी ग माळ
बंधवाची मला ढाल

हाही खुलासा त्याला करावासा वाटतो. त्या कारणानं वडील म्हणजे डौलदार आंबा आणिक आई म्हणजे गोंडेदार झपाईळ तुळस मानून त्या दोघांच्या सावलीत मिळणाऱ्या गडदाबाज झोपेचं सुख भोगायला ते उतावीळ होऊन बसतं. त्यामुळं आपल्याला माहेरी नेणारी धनदौलत—

नारायणा देवा आगाशी तुझी छाया
अमृत द्यावं प्याया भाईराज माझा

त्याच्या मुखी अशा परीनं गुंजारवते. हे गूज मग तिथंच घुटमळतं आणि एखाद्या दमाचा येणारा-जाणारा भेटला तर उंची बदामाच्या झाडाप्रमाणं नू विसाव्याच्या पानमळ्यात वाटणाऱ्या भाऊरायाला सांगावा जातो—

दिवस मावळला खाईल्या मळ्याच्या बोरीवरी
यावं सारंगी घोडीवरी दादाराया

त्यासरशी ह्या भाऊरायाला प्रवासात वेळ झाली तर

दिवस मावळला माळाच्या कोरनीला
चिंता लागली हरनीला

मावलीची माया बोरीबाभळीचा पाला
करवत लागतो जिवाला

मातामावलीची अशी गत होऊ नये असं त्याला मनापासून वाटतं. म्हणून लाडक्या लेकीला त्याच क्षणी वाचा फुटते—

तुझ्या जीवासाठी जीव माझा मी विकीन
सावळ्या बंधुराया तुला ताजवा जोखीन

आणि तिच्या नजरेत त्या घटकेला—

केवडा केवडा वास दरवळत गेला
देसाई बंधुराया देव धावत का आला

हेही सुख विसावतं. त्यासरशी ही लेकबाळ केव्हाच माहेरी जाऊन पोचते आणि रुणझुणतं पाखरू देखील तिच्या आगमनाची वार्ता गावभर सांगून केव्हाच मोकळं होतं.

गडणींच्या मेळाव्यात कोण उठून दिसली
हिरवा शालू नेसली मैना माहेरी ग आली

म्हणताना धुण्याची मोट मोकळी करावी नाहीतर बळताचं तोंड मोकळं होताच हजारो दाणे खाली घसरावेत त्या परीनं हिचं मन मोकळं व्हायला लागतं...

"अगोबाई, माहेरी यायचं म्हणजे पदराची नीट बंदोबस्ती हवी गडे. लोक काय म्हणतील ?" माहेरच्या पाणंदीच्या दर्शनानंही माझ्यासारख्या लेकीबाळीचा जीव एवढा होतो. आणि माहेरघरच्या घराण्याच्या चालीरीती धाव धावून पुढं येतात.

आपल्याला बघून जर कोणी—

हाती कंगण्या दाटल्या जवे दोरे गजरे गोट
सुभेदारिणी तुझा थाट मैनाबाई

असं बोललं तरी देखील—

उभ्या गल्लीनं जाईन खडा हालेना भुईचा
येल शीतळ जाईचा

उभ्या गल्लीनं जाईन पदर माजा काकनात
आयना माझा दुकानात

उभ्या गल्लीनं जाईन मी ग सोडीना पासवा
कुण्या गरतीचा कुसवा

हा डामडौल मला हवा असतो. "अमक्या अमक्याच्या लेकीचं हे वळण घेण्याजोगं हं !" असंच कुणी पण बोलेल असा मी आपल्याला धाक लावलेला असतो. जातीसाठी माती खाऊन दिवस काढावेत पण कुळाला बट्टा लावता कामा नये असा आमच्या घरचा शिरस्ता. बाप्पाजीरायांच्या कुलशीलाला कुणी नावं ठेवू नये म्हणून मी आपल्याला चंदनासारखं झिजवीन म्हणते. भरल्या सभेत सारा जाच सोशीन, वर पापणीदेखील उचलायची नाही पण वडील घराण्याला कलंक नाही लागू द्यायची ! अंहं ! उलट अशी वेळ आलीच तर मी आपल्या आईला सांगीन की—

माझे ग मायबाई नको करूस माझी चिंता
दिलीस भाग्यवंता लेक तुझी

आणिक याउप्पर जर कुठं खटकलंच तर मात्र

सासरचे बोल जशा रेशमाच्या गाठी
सैल कर माझ्यासाठी भाईराया

माझ्या भावाजवळ मी आपलं मन मोकळं करीन...

पण देवा, तेवढीदेखील वेळ आणू नकोस. "वेळच्या वेळेला काम करून ऐस. कुणाची बोलणी खाऊ नकोस असं माझ्या आईनं शिकवलंय." तर मी माझ्या लोखंडाच्या बाह्यांना शिणू नकाच म्हणेन. आणि वागेन पण कशी ठाऊक आहे ?

नाकीच्या नथनीला लावू नये ग टीक फुली
आपुन कुळवंताच्या मुली चंद्रभागे

अशी अशी वागेन. देवाशपथ !

म्हणजे मग माझी आई भेटली की, आम्ही दोघी पोटभर बोलू. बसू.

आमची प्रीत उफाळून अशी वर येईल मग की—

भरली किष्णाबाई जशा दुधाच्या उकळ्या
ह्या ग मनाच्या मोकळ्या मायलेकी

जनलोकांनी आमची अश्शी तारीफ करावी. खोटं नाही सांगत. आई भेटली रे भेटली की लगेच—

उगवला नारायण किरीट किरणांचा
पाखरा फुटे वाचा झाडावरी

असं घडून येईल ! माझं भरलं काळीज भावनांच्या गोण्या उसवीत बसेल न् रात्रीचा चंद्र कलता होईपर्यंत देखील आमच्या गुजाचा झाडा होणारच नाही ! त्यामुळं मग आमचं बोलणं—

पावसावाचून कसा भरारेल मळा
कंथा ग वाचून कामिनीला न्हाई कळा

असं हावशा कांतापासून तो पार नणंदभावजईंच्या गोष्टी काढीपर्यंत आपलं चालतच राहिलं.....

पण हा सगळा मनाचा खेळ अवचितच उलगला. माझ्या तान्हुल्याचे पैंजणवाळे झणकारले न् मी एकदम या समाधीमधून उठले...अजून माझे दादाराया न्यायला यायचे होते आणि मग माहेरी जाण्याच्या गोष्टी पुढं यायच्या होत्या, याची जाणीव झाली. त्यासरशी माझं अंग एकदम शहारलं. सासूबाई परवानगी देतील तरच सगळी गोष्ट होती ना ? म्हणताना खरं सांगायचं तर—

कारल्याचं आळं लाव ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा

कारल्याचं आळं लावलं व फुईजी
बंधू आले न्यायजी
मी जाते आपल्या माहेरा...

हे गीत कारल्याचं बी लावून तो पार कारल्याची भाजी करून ती खाऊन होईपर्यंत माहेरी जायला परवानगी न देणाऱ्या सासूबाई नजरेपुढं उभं करतं झालं न् मेली एकदम हाबकीच बसली !...डोळे अवचितच पाणावले आणिक—

समींदर उचंबळे होता चंद्राचे दर्शन
लेकबाळ हेलावते होता मातेचं सुंबरान

किती ओव्या गाऊ मी ग मावलीचं रीण
हे ग कुणा मोजवती वाळवंटातील कण

किती किती गाऊ मावलीच्या त्या प्रेमाला
कोण प्रदक्षिणा घाली आकाशाच्या त्या सीमेला

ह्या कल्पनेनं जीव पार म्हणजे पारच उडून गेला...अंधारात दिवा असावा न् प्राणाला हवा लागावी त्याप्रमाणं मला हव्या वाटणाऱ्या आईला केव्हा भेटेन असं झालं...पण बोलायचं कुणी न् कसं इथं देवा ?

सासरच्या वाटेला कुचूकुचू काट्यांचं रान आणि माहेरच्या वाटेला मऊ रेशमी हिरवळ ही भावना बाळपणापासूनच भोंडल्याच्या गीतानं आम्हाला शिकवलेली. आणि तेव्हापासूनच सुग्रिणीचा हात शिणगारत जाऊन—

अक्कण माती चिक्कण माती ओटा तो मळावा
अस्सा ओटा सरस बाई जातं ते रोवावं
अस्सं जातं सरस बाई गहू ते दळावे
अस्से गहू सरस बाई करंज्या कराव्या
अश्शा करंज्या सरस बाई दुरडी भराव्या
अश्शा दुरड्या सरस बाई माहेरी धाडाव्या...

असल्या भावनेनं आमच्या मनात तेगारानं ठाण मांडलेलं. त्या कारणानं सासूबाईंनी न् मामासाहेबांनी माहेरचं मूळ परत धाडू नये म्हणून दारी श्रावणाची पागोळी ठिपकल्यापासूनच मी तरी देवाला नवस बोलले बाई. म्हटलं की, या वेळी संक्रांतीला चांगलं वाण वाटीन सवाष्णींना न् घरच्या चुडयाला उदंड आयुष्य मागीन. त्यासाठी मी वेळ पडली तर सासूबाईंचे पाय लोणी लावून रोज चोळीन ! पण माहेरी जाईन तरच नावची !

पण आमच्या सासूबाई स्वभावानं इतरांच्यापेक्षा थोडया बऱ्याच म्हणाव्या लागतील, कारण—

सासूचा सासुरवास नणंदा तुम्ही हळू बोला
माझा दमून भागून कंथ बाहेरूनी आला

या आमच्या भावनेची त्यांना कदर आहे. शिवाय—

लगीनसराई कापडाची महागाई
नेस नेस सूनबाई माझा पीतांबर

अशी देखील त्यांना हौस आहे. त्यामुळं एखादेवेळी——

माझ्या घरी ग पाहुणी जिलबी केली ग साईची
मैना लाडकी आईची मावशीबाई

आम्ही दोघी घरी जावाजावांचा ग जोडा
कोथिंबीरी चुडा भरीयेला

साखरेचे लाडू घरामधल्या पाहुण्यांना
बाप्पाजी देसायांना करीयेले

अशा कवतिकालाही त्या मागंपुढं पाहात नाहीत. त्या कारणानं त्यांचा राग येतच नाही. उलट कधी कधी——

काय मी पुण्य केलं आईपरी सासूबाई
कमळी अंबाबाई पूजीयेली

काय मी पुण्य केलं बापासारखा सासरा
सरीखाली ग दुसरा चंद्रहार
मामंजी सासूबाई तुम्ही तुळशीची झाडे
आम्ही तुमच्या उजेडे राज्य करू

असा दिमाख मिरवताना अभिमानही वाटतो. काही म्हणजे काही उणं वाटतच नाही. पण ह्यांना आम्ही माहेरी जायचं म्हटलं की, ह्यांचं पित्त उसळलंच म्हणावं अगदी ! मी म्हणते हा दुष्टावा काय म्हणून ? कशा-साठी ? तुम्ही नव्हता जात आपल्या माहेरी ? आठवावं की आपलंही थोडं एकदमच सासूबाई तरी नाही झाल्यात म्हणावं तुम्ही ? ह्यांच्या म्हणण्या-प्रमाणं आम्ही कायम सासुरवाशिणीप्रमाणं वागावं. आणि जगानं मात्र नेहमीच—" हसावयाचे, पण दात दिसू द्यायचे नाहीत, फिरावयाचे पण घरातल्या घरात, उंबरठा ओलांडायचा नाही, पाहावयाचे पण मुख वर न उचलता. ही वागणूक कुलवधूंची. " जुन्या काळचे हे दाखले देत असं फार पूर्वीपासून चालत असल्याच्या खुणा सांगाव्यात. अशा वेळी डोकं असं भडकून जातं की, सासरचं माणूस दिसलं तरी माथेशूळ उठावा ! शप्पथ ! आम्हाला मेला जसा जीवच नाही ! छे ! अशा वेळी वाटतं की—

घरचा घरधंदा मी करते
पाण्याला एकली जाते
जीव बाई करींदिरा कामानी
जाते माहेराला...
कधी मी सोडिली का घराची पायरी
कधी ती भेटली का आई माझी सोयरी...

असली भाषा त्यांच्या कानावर दाबून घालायची ! मग काय व्हायचं असेल ते होऊ दे खुशाल. नशीब तर चोरून नेत नाही कोणी कुणाचं ? मग झालं तर !

अहो, माहेरचं मूळ दारी सारखं का येतं म्हणे ! आता ग बाई ? आहे म्हणून येणारच कुणी पण. तुमचं काय गेलं ? फार फार तर—

शेवया बोटव्यांनी उतरंडया आगाशी
भाऊ निगाला उपाशी

घरी बासाचे तांदूळ काय करता असून
सासुरवाशी भैन

आंब्याच्या सावलीत कोयाळ बोले राधा
उपाशी गेले दादा

अशीच पाळी येईल नाही का ? येऊ दे की ! असंही आहे न् तसंही आहे. भ्यायचं कुठंवर ? माझे आईबाप तर खंबीर आहेत ना ? बास मग—

उंच उंच चोळ्या धरा मागली शेती लेती
मावली बयाबाई तिच्या परास चढ घेती

अशी पुष्कळ आहेत माझी मला माणसं. बसा म्हणावं आपलाच हेका धरून ! उद्या बघू तुमच्या लेकीवर हीच वेळ येईल तेव्हा !

झिणकारल्या पायांच्या नणंदबाईच्या लग्नाची भाषा निघाली तेव्हा केवढी दांडगी बोलणी निघालेली....लेक द्यायची कुठं ? कुणाकडं द्यायची ? तर काय म्हणे....

बाभळ बाईचा बाईचा हिरवा पाला
कोण्या देशीचा देशीचा जोगी आला
त्याची किंगरी किंगरी नानापरी
लेक जायाची जायाची कोणा घरी
लेक जायाची जायाची बामण घरी

बामण घरी नको ग माय
सडा टाकिता पराण जाय....

असलं काही नकोच. झाडून सगळ्या जाती अशाच कामावरून नाकारल्या आणि कुळशील बघून लेक द्यायची हा बेत पक्का झाला न् काम करीत नसेल तिथं द्यावी मुलगी हा निर्णय घेतला गेला! मग? आम्ही काय हाडामांसाच्या मुली नाही तर आमच्याएकी एवढा राग? बरंच्या बरं इथं तरी सुख आहे म्हणून. नाहीतर एखाद्या वेळी—

" पतिविरहामुळे क्षीण झालेली सून सासूच्या पाया पडण्यासाठी वाकली. तेव्हा बिचारीच्या दोन्ही हातांतील बांगड्या गळून पडल्या. सासू खाष्ट होती तरी हे बघून तिला रडे कोसळले. "

हा असा प्रसंग उभा राहायचा न् आम्ही दोघी पण माहेरच्या आठवणीनं स्फुंदायच्या! तर काय? सासू झाली तरी सासुरवाशीणच की!... मालकीण झाली म्हणून काय माहेर विसरणार? छे!—

चंद्राच्या प्रकाशी लोपून जाती तारा
माहेरापुढं तोरा मिरवू नये

असंच कोणीही म्हणणार. आणि मग—

पैली माझी ववी सोळा सत्रा कोशींबीरी
आज माज्या घरी भाऊबीज

या गोष्टीतला आनंद आमच्याप्रमाणंच त्यांना पण नाही होणार? नाही कसा? होणारच. आम्ही उतावीळपणानं बोलतो न् त्या वयोमानाप्रमाणं बोलून दाखवीत नाहीत एवढंच म्हणावं फार तर. नाही का?

मला माहीत आहे की, परवा रवा काढायला घरी दळण घातलं तर सासूबाईंनी—

हौस मला मोठी ताईबाईला आणावी
नवी पालखी विणावी रेशमाची

अशी भाषा केलीवती न् नेमक्या त्या वेळी आमच्या दारावरून—

माझ्या ग दारावरनं कोण गेला झपाट्याचा
कुसुंबी मंदिलाचा काका राया

असले माझे चुलते चालले होते. त्यांनी ते ऐकलवतं ! हो, तर आमचं काय म्हणणं की लेकीत न् सुनेत भेदभाव करूच नाही. उलट घरादारात

गोटपाटल्यांच्या ह्या ग लेकी कुणायाच्या
सासू ग मालनीच्या लेकी सुना

माझ्या आत्याबाईची वडील सून कोण
कारल्याची खूण चंद्राबाई

आले आले पटवेकरी पटवाया काय देऊ
बाजूबंदा गोंडे लावू सूनबाई

असा प्रसंग लोकांच्या नजरेत यावा. नव्हं खरं का खोटं ? त्यात जो आनंद आहे तो या धुस्वासात नाही बाई. आमच्या घरी—

दारी आला वैराळ टाका बसाया चोंगडी
चुडा भर नागमोडी भैनाबाई

आमच्या आईप्रमाणं ही भाषा सासूबाईची पण व्हावी तर आम्हाला खरं भूषण ! कारण चिंचेच्या पानावर आम्ही घरधन्याला चिठ्ठी धाडणाऱ्या तर आमच्यावर पण त्यांचा जीव हवाच की ? अहो, तुमच्या दारी चाफा उभा राहिलाय् म्हणूनच ना आम्ही जाईजुई होऊन आलो इकडे ? मग ?

पण हे बोलायचं कोणी न् कसं ? ज्याचं त्यानं समजून घ्यावं हे चांगलं. आईबापांना आमच्याएकी अपयश नको, म्हणून आमचा आपला आनंद

खरा असा एकच—

सात जन्मांची ग पुण्याई आली फळा
आमच्या कुंकवाची कळा सूर्यावाणी

आपल्या मुलाबाळांना कुणी नावे ठेवू नये म्हणून आई-वडिलांनी नेहमीच काळजी घ्यावी अशी जगरहाटी आहे. या गोष्टीला प्रत्यक्ष कृष्णदेवही अपवाद नाही तर ! लहानपणी आपल्याबरोबरीची अशी गौळवाड्यातील मुलं गोळा करून मनाला येईल तिकडं भटकत फिरायचं हा कृष्णदेवाचा स्वभाव. तर एकदा काय गंमत झाली की, मथुरा सोडून कृष्णदेव सागर किनाऱ्यानं आपला फिरायला गेलेला. बरोबर पेंद्या न् बाकीची सगळी. होता होता मग काय झालं की, ही मंडळी आली पार गोमांतकात. तिथं आली तर फिरून फिरून कृष्णदेव थकून गेलेला. भूक लागलेली. तशी एवढंसं तोंड करून सगळेजण जंगल तुडवीत चाललेले हं ! तेवढ्यात काय चमत्कार झाला की, मथुरेच्या नंदाच्या घरी यशोदा माईला हे कळलं. त्यासरशी तिला एवढा प्रचंड पान्हा फुटला की, ते दूध पार गेलं कृष्णदेव होता तिकडे धावतपळत !....

इतकं की, डोंगर कडे ओलांडीत धबधबा होऊन ! जसा काय दुधाचा लोट कृष्णदेवाच्या पुढ्यात आला न् दूधसागरात तो न्हाऊन गेला म्हणावा ! ...का ? तर त्यानं कुणाला काही मागू नये न् त्याकारणानं त्याला कुणी नावं ठेवू नये ही आईची भावना हं त्याच्या !...शाबास शाबास !

आणि खरं सांगायचं तर ही गोष्ट काही कृष्णदेवाच्याच घरी घडली असं नाही. प्रत्यक्ष चंद्रसूर्यांच्या आईनंही पोरांना असं नाही असं बागावं म्हणून शिकवलं ते ! खरं ना ? म्हणजे त्याचं काय झालं की, चंद्र, सूर्य, अग्नी न् वायू ही घरी लहान लहान मुलं हं ! घरात एकली म्हातारी आई. तर एकदा काय झालं की, एक श्रीमंत माणूस त्यांच्या घरी आला. लाखोपती असा. आणि ही म्हातारी तर अगदी गरीब. आता काय करावं ? "का बाबा येणं केलंस ?" म्हातारीनं त्या बाबाला आपलं विचारलं. तशी

तो काय म्हणाला की, मुलांना घरी जेवाय पाठवावं. अन्नकोट घातलाय. पण ही काय म्हणाली की, पोरं लई लहान तर कशाला उगीच बोलावता ? तर हा म्हटला की, कसंबी करून लावून द्याच पोरांना. मग ही बरं म्हणाली. आणिक पोरं खरंच जेवायला निघाली. तशी म्हातारीनं म्हटलं कसं, " लई वचावचा खाऊ नका. दंगा करू नका. नावं ठेवतील माणसं असं वागू नका न् आईची आठवण ठेवा. " तर पोरं बराय म्हटली न् गेली.

होता होता जेवणं झाली. पोरं दाबून जेवली न् घरी आली. तर म्हातारीला सूर्यानं, अग्नीनं, वायूनं म्हटलं कसं, " आई, आई, आमी लई जेवलो. दाबून. खूप खूप उड्या मारल्या न् आरडाओरडा करीत घर डोक्यावर घेतलं. " तशी म्हातारी म्हटली, " आईची आठवण आली न्हाई ? " त्यावर ह्यांनी ' अंहं ' केलं. पण चंद्र पुढं सरसावला. म्हणाला की, " मला तुझी आठवण आली. मी थोडं जेवलो. सगळ्यांच्याबरोबर शांतपणे वागलो. ही बघ तुला मिठाई आणलीय्. " त्यासरशी म्हातारी हारखून टुम्म झाली न् तिनं चंद्राला आशीर्वाद दिला, " दुनियेचा लाडका होशील. समाधान पावतील माणसं तुला बघून. कुणाच्या डोळ्यांत खुपायचा नाहीस." पोटाशी धरलं. त्याच्या अंगावर काळा भर्जरी शाल्ह घातला. मग तिनं बाकीच्या तिघांना काही सांगितलं, जरा रागानंच म्हणाली, " जा ! चालते व्हा ! दुनियेला तुमची गरज लागेल. पण तुमच्या नजरेला नजर द्यायची कुणाची हिम्मत होणार नाही. आईचं ऐकत न्हाई म्हणजे ? " झालं ! सगळे चापचूप बसले, पण आईचा आशीर्वाद सगळ्यांना भोवला. अगदी ती म्हणाली तस्सा !—

पण आई यापेक्षा जास्त रागावूच शकत नाही. अंहं ! आपल्या मुलांचे अपराध पोटात घालून ती त्यांच्या उत्कर्षाचाच विचार करते. म्हणून मुलं वाईट निघाली तरी आई कधी वाईट असू शकत नाही म्हणतात.

त्यामुळेच " दहा उपाध्यापेक्षा आचार्य श्रेष्ठ. शंभर आचार्यांपेक्षा पिता श्रेष्ठ आणि हजार पित्यांच्यापेक्षा माता श्रेष्ठ " असल्याची ग्वाही मनूनं दोन हजार वर्षांमागं देऊन टाकली आहे !

आईची ही थोरवी गात असताना महाभारतामध्ये असा उल्लेख आलेला आहे की, "मातेसारखी सावली नाही. मातेसारखी गती नाही. मातेसारखं छत्र नाही. मातेसारखी प्रिय दुसरी कोणतीही व्यक्ती नाही." म्हणून अमूक एक गोष्ट चांगली व्हायची तर ती आईच्या मायेनं व्हावी अशी अपेक्षा देवदेवतांच्या पुढे देखील मानवानं व्यक्त केलेली दिसून येते.

त्यामुळे ऋग्वेदामध्ये "माता जशी मुलाला धारण करते तशी ही धनुष्याची दोन टोकं राजाला धारण करतात." आणि "माता जशी बालकाला पदराखाली झाकते तशी हे पृथ्वी तू याला झाक." अशा अपेक्षा व्यक्त केल्या गेल्या आहेत.

आईप्रमाणंच वडिलांच्याबद्दलही अशाच भावना प्रकट केलेल्या आढळून येतात. पण इथं लडिवाळपणापेक्षा जीवनातील भव्यतेचीच अधिक कल्पना येते. आईपेक्षा वडिलांचा धाक मुलांना. म्हणून या परीच्या प्रकटीकरणातही स्वाभाविकपणे फरक पडलेला दिसून येतो. ऋग्वेदामध्ये वडिलांसंबंधीचा प्रकट झालेला मनोभाव असा आहे—

"बाप जसा मुलाचे ऐकतो तसे हे इंद्रा, तू आमची प्रार्थना ऐक."

"पिता पुत्राला जसे धन देतो तसे हे इंद्रा, तू आम्हाला दे."

"पित्याचा सहवास मुलाला जसा सुखकर होतो तसा तुझा सहवास होवो."

"पिता जसे मुलाचे बळ वाढवितो तसे हे देवा, तू माझे बळ वाढव."

लोकगीतकारांनी वडील रंगविले ते आणखी काव्यात्मक नजरेने असे. वडिलांची कर्तबगारी शेतीच्या भरभराटीवरून सांगितली न् सोन्याची अंगठी गव्हाची रास मोजताना हातात शिजून गेल्याची अपूर्वाई ऐकविली. शिवाय—

पाणी वरून पडतं घरी मिरची फुलोरा
भरायला मोतीचुरा

असा त्यांचा लौकिक मोठ्या भक्तिभावानं आळवेला. तसंच आपल्या लेकी-बाळींच्या एकी—

जावई राजईसू परसदारीचा मोगयीरा
माजी बाळाबाई जाई गुतली पदयीरा

जावई राजसाचं चिरेबंदी हाई जोतं
बाळाई तोंड धुती पाणी अंजीरा झाडा जातं

अशी कवतिकाची भाषा त्यांनी केल्याचा निर्वाळा दिला.

त्यामुळं माहेरचं सुख सांगताना ही सासुरवाशीण सखूबाई साजणी बोलते कशी—

नेणंता मुरळी ग येतो वाटेनं खेळयीत
ढग वळवाचा गाळयीत जरी पटका लोळवीत

किती वाट बघू बाप्पाजींच्या ग गाडीची
सावली कलली सये उप्पर माळीची

कळी पाटल्याचा हात हात माह्या दरोजाले
किती हाका मारू माता माय गिरजाले

गवयीन्याच्या गाई चरती रानयात
पोळ्या बांधल्या पानायात मायबापाजीले

तर तिचं हे बोलणं ऐकून मधेच जर तिची सखी असलेली एखादी सासुरवाशीण,

" बागणी गावात घातलं आळं, कवठ्यात गेली मुळी, त्येची झाली तुळी, तुळीचा बांधला बंगला, चांदीचं कुलूप, सोन्याचा हात, आतल्या खोलीत जिरेसाळीचा भात, भातावर घातलं तूप, तुपासारखं रूप, रूपा-सारखा जोडा, चंद्रभागेला पडला वेडा, चंद्रभागेत काचेची न्हाणी, आधी होते आईबापाची तान्ही न् आता झाले अमृतराव पाटलांची राणी. "

अशा प्रकारचा उखाणा घालीत आपल्या बाळपणीच्या कवतिकाच्या गोष्टी

सासरी करायला लागली म्हणजे भोवतालचं वातावरण कसं खुलून जातं. आणि मग तिच्या—

" चांदीचं ताट लाडवानं भरलं काठोकाठ बंधुजी बसले जेवायला तर शिवाजीराव तुम्ही समया लावा तीनशे साठ. "

या देखण्या बोलण्याचा अर्थ आपोआप उमजू लागतो. एवढंच नाही तर-—

" गुलालाच्या राशीत पाय टाकते जपून कीर्तीरावांचं नाव घेते चंद्रसूर्य गेले लपून. "

याही कल्पनेची भूल ऐकणाराला पडल्याशिवाय राहात नाही. त्या कारणानं ह्या पोरीच्या—

जातीसाठी माती ग खाताना लागे वाळू
पित्या माज्या दवलता ढाण्या वागा मी तुमचं बाळू

या अभिमानाचा त्याला हेवा वाटतो आणि मग—

"कण कण कुदळी, मण मण माती, चंद्र उगवला मध्यान राती " या कोड्याचं उत्तर देत 'उंबराचं फूल' दिसावं त्या रीतीनं खुशीत आलेल्या ह्या लाडीचं कवतिक करायचा मोह त्याला होतो. त्या नादात—

पावना आला म्हनू नंदकामिनीचा पती
ह्या ग हौशाला विचारीते सोप्या समया लावू किती

ही हौसमौज नखऱ्यानं पुढं येते आणि हिला तिच्या चुलत्यानं आंदण दिलेला पानमळा त्या घरी मोहरून उठतो. चारी बाजूंनी फुलतो. दाट सावली घेऊन येतो. तर त्या धांदलीत ही मैनाराणी—

पावना माझा बंदु जिवा माज्याचा गोंदूळ
दारी वाळत्याती अनारशाचं तांदूळ

माज्या बंदूची कदर    माजी मलाच ग ठावी
तुपा भरीयली वाटी    वेलदोडं तोंडी लावी

आंब्या मोरयाचा भात    ठेवते आदान मोईनीचं
पावनं मला आलं    बाप्पाजींच्या ग गोताचं

या सुखाच्या गोष्टी करीत राहते आणि आपल्या बाप्पाजीबयाचं एकेक आठवीत सुखावते. अशा वेळी तिचा जीव आनंदानं भरून येतो.

माजा ग मायबाप    काशीखंडाचा केवयीडा
दोघांच्या सायासाचा    माजा जलम येवयीडा

माजा ग मायबाप    दोनी काशीचं बुरायाजू
माजा त्यो बंदुराया    वर पाण्याचं कारायांजू

चंदन चंदन    चंदनाची ती बारा नावं
मायबापायांच्या ग सये    मैलगिरीच्या पोटा यावं

तांबड्या मंदिलाचा    वाटं निराळा कोण झाला
मावलीच्या पोटी    पुत्र गिन्यानी जलमला

हुरदं हुंकाराचा    माज्या हुरदी झाला पेडा
सत्गुरूनी तरी माज्या    बरमरसाचा दिला काडा

आणि मग—

दिव्याला भरायान    घाला दिव्याला जोडवात
वडील भैनी ग    गुज बोलू या सारी रात

अशा भावनेची घट्ट पायाभरणी होत जाते. त्यासरशी जरीमंदिलाचा भाऊ झुकत झुकत हिच्या गावी येतो. हौसेच्या माक्ळणीनं गौळणी काढलेल्या कशिद्याचा खण त्याच्या हाती दिसतो. चिंचेच्या पत्रावळीवर जेवणारी भाचीबाळ त्याच्या धोतराच्या घोळात घुटमळलेली दिसते. अणिक सांगावा

काय येतो तर—

अंबारीचा हत्ती साजसकट उबा केला
वडील बोलत्याती बाळ अंदान दिला तुला

म्हणताना ही मैनाराणी उठते न् माहेरी जायला निघते. घरच्या लोकांची परवानगी घेत असताना दिवस मावळायला येतो आणि वाऱ्यासंगं बातमी येते की—

गावाला गेला कुणा माज्या अंब्याचा टगळा
माज्या बाळीपाशी जीव लागला सगळा

त्यासरशी घारीप्रमाणं ही मायबाईला जाऊन भेटते. आणि—

सुकदुकाच्या हुरदी बांदल्यात मी ग पुडया
माजे तू मायबाई बस सोडीत थोडया थोडया

सुक सांगताना दुकाला भर आला
पिता राजस दौलत नेत्राला लावी शेला

उजेड पडला चांदापरीस चांदनीचा
माय माज्या मावलीचा चुडयामागल्या कंगनीचा

या भावसागराला प्रचंड भरती येते. सारं माहेर जणू त्या कारणानं सुखावतं आणि मग बहीणभावांची दृष्टभेट होताच सुखदु:खाच्या होडया मनी दाटलेल्या तुफान वादळातही तरंगत राहतात ! आणि—

नारायणा देवा आगाशी तुझी छाया
अमृत द्यावं प्याया बंधुरायाला

तुमच्या जिवापायी होईन वनीची हरीण
सावळ्या बंधुराया तुम्हा भवती चरीन

हे बघून ह्या राजसबाळीचे आई-वडीलही विलक्षण सुखावतात. त्यांचं मन एवढं संतोष पावतं की, त्या वेळी या आनंदाच्या भरात—

आऊक्षाच्या दोऱ्या माज्यावरी ग फेकिल्या
लाडक्या बाळराजा तुम्हावरी म्या झोकील्या
आगाशीचा चांद का ग थांबला दारापाशी
सांगते भैनाबाई मायलेकींना पाह्यासाठी

या सुखाच्या राशीवर त्यांना डौलानं उभं राहायचा मोह व्हावा !...त्यामुळं या तीर्थांच्या सागरांना दंडवत घालताना हे बहीण भाऊ आपल्या नेत्रातील टपोऱ्या मोत्यांची ओंजळ त्यांच्या चरणी अर्पण करीत आपल्याच मनाशी बोलतात कसे, "एक वेळ चंद्राची कांती त्याला सोडून जाईल, हिमालयावरचं बर्फ वितळून जाईल, सागर सीमा ओलांडून जाईल पण आम्ही बरीक आमच्या मातापित्यांच्या आज्ञेचं कधीही उल्लंघन करणार नाही."



# ४



## प्रीतीचा चंद्रहार

जरतारी पायघोळ साड्या नेसलेल्या, गोऱ्या गोऱ्या कपाळी कुंकवाच्या चिऱ्या ल्यालेल्या, गोंड्याच्या वेणीवर मोगरीच्या कळ्या माळलेल्या, राखडी केवड्याच्या दिमाखात कोवळ्या नाकाच्या शेंड्यावर करवंदी मोत्यांची लाखमोलाची नथनी घातलेल्या, बाजुबंद-वेळा ल्यालेल्या, नाजूक दागिन्यांनी दाटलेल्या, विजेगत लवतेल्या, शालू पैठणींचे पदर पाठीवर घेतलेल्या, तोडीच्या वाक्या न् कुलपाचा कमरपट्टा घातलेल्या, ठुश्या पेट्यांच्या, तन्मणीच्या, बिंदी-बिजवराच्या, चंद्रहाराच्या अशा मैत्रिणींच्या घोळ्यामेळ्यात हिरव्या बुट्टीदार शालूनं उठून दिसणारी मी त्या दिवशी जाईजुईच्या मांडवाखाली बसलेवते खरी पण काळीज मेलं उगीचच उडून गेलं होतं. इतके दिवस अनोळखी असलेलं कुणीतरी ओळखीचं व्हायला आपलं म्हणून माझ्या आयुष्यात येणार होतं. त्यामुळं कसल्यातरी आनंदानं कल्पना कंपित झाली होती. कुठल्यातरी ठाऊक नसलेल्या समाधानानं मनातली वीणा छेडली जात होती. मनीं दाटलेलं स्वप्न मोहक सुगंधी दरवळीनं माखलं जात होतं .. आणि आता उद्या पहाटे आमच्या गावात पाऊल टाकणारा सब्जा मला दिसणार होता

म्हणताना त्या वासाच्या वेलदोड्याला घेऊन येणाऱ्या शारदलक्ष्मीला मी आळवीत म्हणत होते, " बये, तू येताना पांढऱ्या शुभ्र मेघरायांच्या

रथात बसून ये. उगवतीनं उधळलेल्या गुलाब पाकळ्यांच्या थव्यातून ये. नीलांगणातील निर्मळ रस्त्यावरून हळूहळू ये. पर्वतराजीवर पसरलेल्या दाट बर्फाच्या पायघडीवरून हलक्या पावलानं ये. आणि हे बघ, हळूच या दुनियेवरचा दवबिंदूंनी झाकलेला पडदा बाजूला करीत पुढं ये. सोनेरी किरणांचा मुकूट लेवून मोत्यांच्या सडका फेकीत येणाऱ्या उगवतीचा हात धरून प्रकाशाचे झोत उधळीत उधळीत तू ये. तुझ्याबरोबर एक माणूस येणार आहे माझं होईन म्हणून सांगत. मालक व्हायच्या ऐटीत! तर त्याला बुट्ट्याच्या शालूशेल्यांच्या पायघड्या न घालता तेजस्वी रथातून येऊ दे. शतजन्मीची पुण्याई फळाला येऊन सूर्याच्या तेजानं माझ्या भाळी कुंकू लावायला स्वारी येत आहे. तर म्हणावं की, रूप लावण्याच्या बेर-जेची माळ गुंफीत न बसता लाखात एखादा होऊनच येणं करावं. टिप्पूर चांदण्याच्या सोबतीत शेजेच्या भ्रताराची सोबत कृष्ण देवागत व्हावी लागते म्हणावं! आमच्या बाप्पाजींच्या घरी अमृताचा डेरा घुसळीत मी आरशाची पेटी होऊन बसले आहे. लगीनसाज अंगावर घालायला निघा-लेय म्हणावं. रत्नजडित चुडा ल्यायला निघालेय तर आपण तेहेतीस कोटी देवाजींचे आशीर्वाद घेऊन न् मोहरांच्या राशी मोजताना झिजलेली अंगठी लेवून या म्हणावं, " कळलं ना बये? शप्पथ! नाहीतर माझा फजित-वाडा होईल."

लहानपणी भावलाभावलीचं लगीन निघालं तरी आमची कोण धांदल उडायची. किती मानपान निघायचे. अशा वेळी वधू पक्ष आणि वर पक्ष यांच्यात—

" तुमच्या मुलीला काय पाहिजे?"
" आमच्या मुलीला तोडे पाहिजेत."
" तोडेबिडे करून, कंगणी तार करू"
" तुमच्या मुलीला काय पाहिजे?..."

असली ढिगानं बोलणी व्हायची. पाटीभर दागिन्यांची बोली करूनही

तेवढ्यानं भागली नाही हौस, तर मग दुसऱ्या स्थळाची गोष्ट निघायची ! खरंच ! तेवढंच नाहीतर—

“ पावशेर कोंडा घ्या हो विहिणी
बरम्या लेकी द्या हो विहिणी
पावशेर कोंडा घेत नाही
बरम्या लेकी देत नाही ”

असलं बोलणं करून मणभर कोंड्यावर सोईरसंबंध जुळायचे ! आणि ...

लवलव साळुबाई मामा येतो
खोबऱ्याची वाटी तेवढी मलाच देतो

हा दिमाख ऐटीनं पुढं व्हायचा. त्यामुळं रत्नजडित नारळ हाती घेऊन येत इंद्रानं वधू बाप होऊन लक्षाधीशाची खोडकी मोडली त्याप्रमाणं एकमेकी एकमेकींवर तुटून पडायच्या. अखेर शेवटी—

आंबाडीच्या भाजीला तांदुळाची कणी
येईल घरचा धनी त्याला सांगू नका कुणी

या परीनं समेट व्हायचा आणि लगीन लागायचं. तर मी म्हणते उगाच असं व्हायला नको. हळदीचं तेज ल्यावं, कुंकवाचं राज्य भोगावं, जन्मभर चुडा ल्यावा, चंद्रसूर्यांना साक्षी ठेवावं, सुखाचे दिवस घालवावेत आणि अखंड सौभाग्याची मालकीण व्हावं, यापलीकडे आम्हाला काही एक नको. आमच्या आईचं म्हणणंच मुळी की—

नको हो पैठणी नको मला शाल्ू शेले
भाळ असो भरलेले कुंकवाने

नको मज बिंदी नको तो चंद्रहार
पुरे एक अलंकार मंगळसूत्र

आम्हाला मुळी वळणच हे.

तंगदार जरीबुट्ट्यांची चोळी दंडावर असावी, पाच कळशी बुगडी-खाली सोन्याची कर्णफुलं डोलावीत, बिलोरी आरशाचा छत रंगमहालाला असावा, छप्पर पलंगावर जाई-मोगरीचं अंथरूण असावं, तुळशीच्या रोपा-प्रमाणं असणारे सासू-सासरे कवतिकाचे असावेत आणि इकडची स्वारी हौशी असावी की बास ! असं असल्यावर ती भोंडल्याची गाणी येतीलच कशाला पुढं पुढं करीत ?

भली दांडगी बांधीव विहीर त्यावर देव अर्जुन मोटकरी. समोर नंदी मधे मी. आणि मग... छे ! माझ्या देवा मी एवढ्यातच तुम्हाला बोलवीन म्हणजे ? हे पाहा, तुम्ही कसेही असा. मी तुमचीच आहे. तर आपल्या घरी की नाही—

सासू कशी सासू कशी
टिचकीनं मारायची पिसू जशी
सासरा कसा सासरा कसा
रहाटाचा कासरा जसा
दीर कसा दीर कसा
खराट्याचा हीर जसा
नणंद कशी नणंद कशी
भाताची कणंग जशी

असलं गीत खेळताना देखील मी कुणाला म्हणू द्यायची नाही. मला नाही खपत असली चिडवाचिडव, धूसपूस आणि मनातली अढी. सग-ळ्यांनी कसं प्रेमानं वागावं असं माझं म्हणणं. त्यासाठी—

ते कसे ते कसे
देव्हाऱ्यातले देव जसे
मी कशी मी कशी
घरादारातली लक्ष्मी जशी

असला अहंभाव पण नको गडे. त्यातूनच वाईटपणा उभा राहतो. सासर तेवढं द्वाड वाटायला लागतं. आणि मग—

सासरच्या वाटे कुचूकुचू काटे
कोण पावणा आला ग बाई हूं...हूं...
सासू पावणी आली ग बाई हूं...हूं...
सासूनं काय आणलं ग बाई हूं...हूं...
सासूनं पाटल्या आणल्या ग बाई हूं...हूं...
पाटल्या मी लेत नाही
संगं मी येत नाही
चारी दरवाजे लावा ग बाई हूं...हूं...
झिपरं कुत्रं सोडा ग बाई हूं...हूं...

असलं गीत सगळ्यांचा उद्धार करीत घुमत राहतं. मी म्हणते अशी वेळ आणाच का? आणखी—

पती पावणा आला ग बाई हूं...हूं...
पतीनं काय आणलं ग बाई हूं...हूं...
पतीनं चाबूक आणला ग बाई हूं...हूं...
चाबूक मी लेते संगं मी येते
चारी दरवाजे उघडा ग बाई हूं...हूं...
झिपरं कुत्रं आवरा ग बाई हूं...हूं...

हा तरी प्रसंग कशाला उभा करा? चाबकाला मेलं भ्यायचं? त्यापेक्षा चाबूकच हातात कशाला यावा मी म्हणते?

पूर्वीच्या काळी म्हणतात की, परक्या मुलखात लगीन झालं की, नवऱ्याजवळ चाबूक द्यायचे नवा कोरा. का? तर म्हणे बायकोला ताळ्या-वर ठेवावी म्हणून! रामा, शिवा, गोविंदा! असलं काही एक नको मला. आमच्या घरी असला रिवाजच नाही. सोन्याचे डेरे, मोत्यांची रवी असला डामडौल पण नाही न् नणंदा-भावजयांत भांडण पण नाही. आम्ही

सगळी गुण्या-गोविंदानं राहतो. प्रेमाची कारंजी इथं उसळतात. तशी ती तिकडे पण असू देत. त्यासाठी डोळ्यांत काजवे फुलू देत. मनात प्रेम दाटू दे. काळीज मोठं होऊ दे. वाणी उदे बोलू दे.

म्हणून म्हणते माझ्या प्रेमाच्या सागरा, माझ्या डोळ्यांना मुग्ध करीतच तू ये. माझं भाग्य तू उजळणारा हो. माझ्या हृदयाच्या किल्ल्या घेऊन तू हे प्रीतीचं भांडार उघडायला ये. तुझ्या अद्‌भुतरम्य दर्शनानं मी धन्य होईन. माझ्या हृदयानंदा, तू कसा येशील ? खरंच कसा येशील ? रथात बसून का शेलक्या वारूवर स्वार होऊन ? तू येशील त्या वेळी मी एकटी असेन. मी आपल्याशीच बोलत बसलेली अशी. तुझ्या वाटेकडे डोळे लावून. नेत्रांची पंचारती करून...काळजाची पायघडी पसरून, हृदयाची धनदौलत सामोरी घेऊन.

माझ्या देवा, तुझ्या दर्शनासाठी मी गेली कित्येक वर्षं उतावीळ झालेय असं वाटतं हं आता ! कोजागिरीच्या धवळलेल्या चांदण्या रात्री भर्जरी शेला अंगावर घेऊन आपणच ना गेल्या साली "येऊ का ? येऊ का ?" म्हणून विचारलंत ? त्या वेळी एकदम काही उमगलं नाही. म्हणताना नेत्रात चंद्रसूर्यांचे दिवे पाजळून मी आपला शोध घेतला. शप्पथ ! त्या वेळी वाटलंवतं की, माझ्या काळजातल्या मोहरून उठलेल्या प्रीतिरसानं तुम्हाला न्हाऊमाखू घालावं आणि लाजऱ्या-बुजऱ्या झालेल्या माझ्या खुळ्या जिवाची आपल्यावरून कुरवंडी करीत ती ओवाळून टाकावी.

पण स्वामी, आपण आहात तरी कसे ? कुणासारखे आहात दिसायला ? मला मेलीला काहीच ठाऊक नाही. त्यामुळं भांबावलेल्या नजरेनं, उरीपोटी दाटलेल्या उमाळ्यानं आणि आसुसलेल्या भावनेनं तुम्हाला केव्हा एकदा बघीन असं झालंय. माझ्या नेत्रांत तुम्ही यावं आणि ओठांवर तुमचं नाव घोळावं म्हणून मी आपल्यालाच लाख वेळा दरपणात बघितलं असेल न् आपलंच नाव शंभर वेळा घोळलं असेल ! त्या वेळी वाटायचं की, नको बाई हा उतावीळपणा. उगीच दृष्ट व्हायची !... म्हणून मी आपली गप्प

राहायची. पण मग एक दिवस आपली स्वारी आली अवचितच... आणि मग... जाऊ दे बाई. सगळं बोलायचं असतं का? अंहं! ते अनुभवण्यातच मी धन्य झाले...

ऐकलंत का? आईचं म्हणणं की, "माझ्या प्राणसखीच्या चुड्याला मी आपलं उरलं आयुष्य देईन!" तुमच्यावर केवढा तिचा जीव आहे. केवढा? आभाळाएवढा मोठ्ठा. घरी जावई यावेत ही तिची कोण हौस. बिचारी एकसारखी कष्ट उपसते आहे. रात्रंदिवस केवळ तुमचं माझं सुख उभं करावं म्हणून ही तिची खटपट बरं?... त्यामुळं काल परवा--

दुरड्याच्या दुरड्या आणलाय भात
याही करी मात विहिनीची
आता माजी सखूबाई
असा कसा तुझा याही
गुलालाची दाटी न्हाई
पेढ्याची माडी न्हाई
होती त्याचे गोळे न याही करे सवळे न् यिहीनीचे
परातीच्या पराती आनल्यात पोळ्या
याही घाली मिठ्या यिहीनीला...
पुड्याचे पुडे आनलाय गुलाल
याही झाला दलाल यिहीनीचा...
आता माजी सखुबाई
असा कसा तुझा याही
गुलालाची दाटी न्हाई
पेढ्याची माडी न्हाई
होती त्याचे गोळे न् याही करी सवळे यिहीनीचे

असलं गीत झालीच्या कारणानं बासनातून काढलं तर ही म्हणाली की, दोन्हीही घराणी घरंदाज. असलं उणंपुरं बोलणं नकोच. म्हणताना एका

म्हातारीनं चारपाच दिवसांमागं सगळ्याजणी तांदूळ निवडीत बसल्या असताना चुटक्या वाजवीत एक गीत सांगितलं होतं गंमत म्हणून, तर ते ऐका म्हणाली—

झुन् झुन् वाजंत्री वाजती
म्होरं कळवातनी नाचती
नवरा आला शिवेपाशी
शिवपुंजन देईन
नवरी जितून नेईन

झुन् झुन् वाजंत्री वाजती
म्होरं कळवातनी नाचती
नवरा आला मारुतीपाशी
मारुतीला इडाजी ठेवीन
नवरी जितून नेईन

झुन् झुन् वाजंत्री वाजती
म्होरं कळवातनी नाचती
नवरा आला मांडवापाशी
मांडव खंडूनी देईन
नवरी जितून नेईन

नवरा आला भवल्यापाशी
करवली खण जी देईन
नवरी जितून नेईन...

दारी होती बोरं बोराई
तिजवर होता चोर जावई
त्यानी नेली आमची बाई
धावत काडा त्येच्यापायी
ज्याची होती त्यांनी नेली

येडी माया वाया गेली
झाली मंदी पाच बोरं
मायबाप झाले थोर
झाली मंदी पाच चिंचा
मायबापा पडली चिंता
झाली मंदी पाच आवळे
मायबाप झाले पिवळे
झाली मंदी पाच फण्या
वराडाच्या घाला येण्या
झाली मंदी पाच नाडे
वराडांनी जुंपले गाडे
अग तू नेवाळणीबाई
तुजा नेवाळी कुठं गेला
गेला येळायीच्या बना
येळू तोडीलं तातू जसं
झाली विनल्या झाप जसं
झालीचं वो मोल कायी
सवाई वो सोनटका
सांगा नवऱ्याच्या बाप्पा
झुन् झुन् वाजंत्री वाजती
म्होरं कळवातनी नाचती

तर त्यातल्या " नवरी जितून जाईन " या कल्पनेनं मी आता सासरी जाणार ही गोष्ट एकदमच आईच्या पक्की लक्षात आली. तशी तिचे डोळे पाणावले. माझीही नजर ओलावली. पण देवा, दोघींच्यात फरक होता. तिला मी सोडून जाणार म्हणून आई व्याकुळली होती. आणि आपण भेटणार म्हणून मी सुखावले होते. तिच्या नेत्रातून वात्सल्य उसळत होतं आणि माझी पहिली नजर धुऊन जात तुम्हाला भेटायला ताजी होत होती.

त्यामुळं नदीच्या पलीकडील गौळवाड्यातील सातजणी गौळणी मला चिडवीत होत्या. पिवळा शेला पांघरून, हिरवा शालू नेसून, सोन्या-रुप्याच्या भिंती ओलांडून, आडकित्त्याच्या देव्हाऱ्यातील देवाला पुजून, गोविंदाला जेवायला वाढून, दामूजी सोनाराला ऱ्हाईसाठी नथ घडवायला सांगून, त्या नथीला रवा जोडायला बजावून अशा त्या आल्या होत्या. त्या वेळी आपाळ्या न् जपाळ्या वडाखाली कोतमीरी पानावर मी उभी होते. लांबून दिसणाऱ्या हिरव्या रानावरचे पिवळे ठसे बघत मी तुम्हाला शोधीत होते. त्यामुळं गौळणी मला चिडवीत होत्या. पण मी आपल्याच नादात होते. कधी न पांहिलेल्या तुम्हालां बघीन म्हणत होते. म्हणतानां—

उजेड पडयीतो नाक्याच्या कंदीलाचा
हावशा माज्याच्या जर झळकतो मंदीलाचा

मोठे नि मोठे डोळे डोळे ठेवीतो ठेवनीला
हावशा राजस झाड सुरूचं लावणीला

मोठे नि मोठे डोळे तुमच्या भिवया बारीक
सुरमा लियाची तारीफ

दवत लेकयीनी शाई कापती थरथरा
माजा लिवणार हात गोरा

पाण्याला जाती नार तिची घागर सूर्या डोलं
हौशा गारूडया विद्या बोलं

सावळी सुरईत माज्या सपनी साऱ्या रात
हिरा झळकतो काकनात

गावाच्या वकीलाची मी ग गळयाची गळपोत
चंद्र हिलालाची ज्योत

कुणाकुणाच्या तोंडून ऐकलेली ही गीतं मनात भरली, ओठांवर आली आणि त्या नादात मी तुम्हाला पारखून घेतलं. कृष्णदेवाच्या रुक्मिणीप्रमाणं

पत्रिका लिहावी म्हणाले. त्यासाठी देवीच्या देवळाची खूण सांगून तुम्हाला या म्हणावं असं वाटलं. मोत्यांचे झुबे देवीला वाहीन असं देखील बोलले. ऊसमळे पानमळे आंदण द्यायची भाषा मीच केली हं! तशी काय झालं कोण जाणे बाई, सवय नसलेली मी एकदम उखाणाच घालून मोकळी झाले...

"चांदीचं तपेलं आंगुळीला, चंदनाचा पाट बसायला, जरीकाठी धोतर नेसायला, सहाण येवल्याची, खोड बडोद्याचं, केशरी गंध लावायला, गंगाभागीरथाचं पाणी शिवपूजेला, चांदीची ताटवाटी जेवायला, आंबे-मोहोराचा भात, वर केशरी वरण दाट, ताट बिल्वरी, डबा माहुलीचा, डब्या गजनीच्या, कात कोकणचा, चुना भोकरचा, पान रामटेकचं, जायपत्री जळगावची, लवंग विजापूरची, चिकणी सुपारी सोलापूरची, लाल गादी मुंबईची, लोड सातार्‍याचे, उशा खिनखापाच्या पुण्याच्या, पलंग मोराचा कराडचा, हिर्‍या माणकांच्या झुंबरांचा लकलकाट न्...रावांच्या जिवावर झाला हळदीकुंकवाचा गजर दाट."

त्यासरशी सगळ्याजणी अशा हसल्या की, मी लाजून लाजून पारच लोळणफुगडी घातली. सगळं अंग घामेजलं न् हातपाय गार पडले! वाटलं की, ही माणसं मला हावरी म्हणतील आणि सासेरी वाटेल ती बातमी जाऊन माझ्याबद्दल हवं ते मत उभं होईल उगाचच! खरंच, दातखिळी बसावी त्याप्रमाणं मी आपलं तोंड गप्प केलं आणि धडधडत्या छातीला गच्च आवळून धरली...मग मी हळूच तिथून पाय काढला...रेशमी रंगीत झालरींनी सजवलेल्या मंडपात आले. तर तिथं हंड्या-झुंबरांचा लखलखाट झालेला. शंभरावर खांबाच्या मंडपाला रातोरात शोभा आलेली. आणि आमच्या घरच्या करवल्या माचावर बसून मोती गुंफीत मला चोळी शिवीत बसलेल्या! म्हणताना मी पण तिथं गेले तर—

आणीले रूखवत बत्तीस ताटांचे
गोत आहे मोठे नवरीचे

आणीले रूखवत मंडपी असू दे
मानापानाची येऊ दे करवली

वाजंत्री वाजती आता उठा घाई करा
घोडा आहे उभा दारा शिणगाराचा

सजविल्या घोडयावरी नवरा बसवीला
एकच घोष झाला वाजंत्र्याचा

नवरा मुलगा हत्तीवर उभा करा
करवलीला चुडा भरा मानाचा

नवरा मुलगा हत्तीवर चढे
दुही बिंदी उजेड पडे चकचकाट

चौघडे कडाडती उडताती बार
आला आला वर नवरीचा

शिंगे वाजताती कुणी वाजविती झांजा
मुहूर्त तिन्हीसांजा गोरजाचा

वरापाठीमागे येती मानाच्या वऱ्हाडणी
अप्सरा स्वर्गातुनी उतरल्या

आल्या बघा बायका करूनी शिणगार
पैठण्या पितांबर झळकती

ह्या ओव्यांचा दणका तिथं उडून गेलेला. त्या कारणानं लाजून लाजून आधीच लाल झालेलं माझं तोंड आणखीनच लालावलं, म्हणताना मी घरात धूम पळाले. माझ्या येतेल्या राजेश्वराला बघायला उतावीळ झालेल्या मनाला जरा दमानं घे म्हणाले. आणि माझ्याच नजरेला मी बजावलं की, अशी उतावीळ होऊ नकोस. आंबराईत वराड उतलंय. तू जडित्राची पेटी. दमानं घे जरा. तुझी नजर अशी तेजस्वी ठेव की, स्वारीचा शीणभाग उतरला पाहिजे तुला बघून. पंचप्राण नजरेत आणून तू त्यांना पहायचं

आहेस. सूर्याची कन्या राधिका होऊन तू त्यांना लगीन माळा घालणार आहेस. मग माझी मीच दमधीर झाले. कोवळ्या शेवंतीच्या कळीनं दमावं भागावं ना, तशी हं! म्हणून चंद्रम्याच्या कोरीचं रूप लेवून आलेल्या मी अंतरंगात शहाणी व्हावं म्हटलं. त्यासरशी सुपली कुरकुलीचा बालपणीचा खेळ मागं सरला आणि पिकल्या तोंडल्यागत लालचुटक ओठांच्या माझ्या कायेनं आता आपण मोठं झाल्याची वार्ता मला सांगितली. मामारायांनी आणलेली तेलंग साडी त्या वेळी मी नेसलेवते, तर त्या साडीच्या राघुमैनेनं माखलेल्या पदरानं मी माझं तोंड पुसलं आणि आता काही खावंप्यावं म्हटलं इतक्यात कुठूनसा कसला तरी गोड आवाज कानात घुमला... त्यासरशी माझं मन पाखरागत एकदम उंच आभाळात उडालं...तिथं मी खरोखरच सूर्याची कन्या झाले न् नववधूच्या दिमाखानं विवाहासाठी निघाले... शप्पथ!

काजळ माखलेल्या डोळ्यांनी त्या वेळी आकाश आणि पृथ्वीच्या सौंदर्याचा खजिना मनसोक्त लुटला. चंद्रसूर्यांनी ओढून न्यावं अशा रथात मी बसलेली. देवदेवता मला आशीर्वाद देतेल्या आणि रत्नखचित चुड्यानं शोभिवंत झालेला माझा हात माझं माणूस आपल्या हातात हसतमुखानं घेतेलं!...

अगबाई! ह्या नुसत्या कल्पनेनं देखील मी गोरीमोरी झाले आणि जीवनातल्या ऐश्वर्याच्या उभारणीसाठी त्यांच्या हातात दिलेला हात मी स्वतःच प्रेमानं कुरवाळू लागले. त्या वेळी नववधूच्या शिणगारासाठी आलेल्या भगवती सरस्वतीला आणि लक्ष्मीला वंदन करीत मी सासरी चांगली वागेन म्हटलं. एवढंच नाही तर जपानमधील नववधूनं ध्यान्यात घ्यावयाच्या...

१. मुली, आज विवाह झाल्यानंतर तू केवळ आमची मुलगी राहणार नाहीस. आजपर्यंत तू आपल्या आईवडिलांचं ऐकत आलीस. यापुढं तुला आपल्या सासूसासऱ्यांच्या आज्ञेचं पालन करावं लागेल.

२. विवाहानंतर तुझे एकमेव स्वामी तुझे पती राहतील. त्यांच्याशी

नेहमी नम्रतेनं व प्रेमानं राहा. आपल्या पतीच्या आज्ञेत राहणं हाच स्त्रीचा सर्वश्रेष्ठ गुण आहे.

३. सासरच्या मंडळींशी नेहमी आदबीनं राहा. सहनशील होऊन त्यांची सेवा कर.

४. सासरच्या मंडळींशी कधी भांडण करू नकोस. तसे झाले तर तू आपल्या पतीच्या प्रेमाला मुकशील.

५. पतीच्या हातून काही वेडंवाकडं घडलंच तर सहन करायला शीक. रागवू नको. बोलू नकोस त्यांना. पतिदेव शांत झाले की, नम्रतेनं त्यांची समजूत घाल.

६. फार बोलू नकोस. खोटं बोलू नकोस. शेजाऱ्यांची निंदा करू नकोस.

७. हात बघणाऱ्या जोतिष्याजवळ आपल्या भाग्याची विचारपूस करू नकोस.

८. नेहमी सावधानता ठेवावी. फार खर्च करू नये. घर कसे ठाकठीक असावे.

९. आपल्या पित्याच्या उंच कुळाबद्दल, घराण्याबद्दल अगर ऐपतीबद्दल घमेंड बाळगू नकोस आणि पतीच्यासमोर ही ऐट मिरवू नकोस कधी.

१०. तू तरुण आहेस. परंतु बरोबरीच्या मुलींच्यामध्ये फार ऊठबैस ठेवू नकोस. वडीलधाऱ्यांच्या सहवासात ऐस.

११. नेहमी अशी वस्त्रं नेसत जा की, ज्यायोगे स्वच्छता दिसेल आणि तू नम्र व कुलीन दिसशील. फार भडक वस्त्र नेसू नकोस. तू सर्वांची आवडती हो..." ह्या गोष्टी मी खडाखड म्हणून दाखविल्या.

पण त्या वेळी जवळ कोणी नव्हतं. हौशा सरदार मनी होते. त्यांच्या पारखीच्या मीच फक्त ते ऐकलं होतं. केळी, नारळी जावाजावांनी, जाई-जुई बहिणींनी, गुलाब-मोगऱ्या दिरांनी पण ते ऐकलं होतं. सूर्यफुलानं दिवसभर सूर्यदेवाच्या दिशेनं फिरावं, तशी ही बातमी त्यांच्या कानावर जाणार होती. ती ऐकून ते सुखावणार होते. त्यासरशी आभाळीची चांदणी

नाजूकपणे हसायची होती आणि आनंदाच्या भरात त्यांचा मनमोर नाचायचा होता. गगनीचा तारा त्यांना बघून चमकणार होता आणि भ्रताराच्या या सुखात मी पण सामील व्हायची होते...

त्यासाठी उद्या मी लगीनसाज ल्यायला निघाले होते... थाटामाटानं डामडौलानं. हळदीनं माखलेल्या पिवळ्या पायांनी. चंदनाची उटी ल्यालेल्या नाजूक हातातील चुड्यांनी. हृदय हुंकाराच्या गजबजीनं. बहीण-भावांच्या साक्षीनं. तांबड्या मंदिलाच्या छायेखालनं. नवरीच्या दिमाखानं. नव्या वस्त्रातील झगमगीनं. नव्या अलंकारातील चकचकीनं. म्हणून माझ्या माणसांनी कोकणातून आलेल्या आत्याबाईच्या म्हणण्याप्रमाणं,

" नवरीला पुतळी. कानी घालायचा राजकडी. मनीमंगलसूत. पाटली भरपूर बांगड्या. लगीनचुडी. नवऱ्याला राजकडी. घाटलं शेंगा, " इत्यादीची तयारी आईनं कधीच करून ठेवली होती. शिवाय मावशीच्या हौसेपायी माझ्या हातांवर मेंदीची नक्षी निघून पायाला पण त्या मेंदीच्या नक्षीचा साज केव्हाच चढला होता.

हलग्या शिंग्यांच्या निनादात मांडवात केळीचे खुंट दर खांबागणिक आले होते. लग्नाचं तोरण दारावर बांधलं होतं. खंडीभर गणगोतांनी तिला तांदळाचा, गव्हाचा आणि जिऱ्याहिऱ्याचा घाणा भरला होता. तिथं--

घाणा भरीयला पाच कुडवती
सवाष्णी पाच येती मानापानाच्या

घाणा भरीयला सुपाच्या तेजानी
सूर्याच्या किरणी उल्हासला

ह्या थाटानं लोकांचे डोळे दिपले होते.

उभं कुडवी सारविलेल्या भिंतीवर नक्षीच्या गौळणी आणि देवांचे छाप चुन्यानं रंगले होते. सोपा भरून दुरड्याचा घोळीमळा बसणारा रुखवत मामीनं सजवला होता. आणि आल्या गेल्याचं हसतमुखानं बघत घरची धन्याची कोतमीर सून राधाराणी, धरणीवर पाय ठरू देत नव्हती.

आता फक्त उद्याची उगवती यायची होती न् माझे पतिदेव लग्नाला उभे राहायचे होते एवढंच बाकी उरलं होतं. सजवलेला शेलका वारू दारात उभा होता. नक्षत्रमाला चमकत होत्या. अब्दागिरी नटली होती. वराड तयार होतं. जावानणंदांच्या मेळ्यात माझी मावली तयारीला लागली होती. आणि––

मिरविती वरमाई पाय घड्यावरूनी जाई
मिरवत मिरवत पिवळ्या पायी दारी येई
घोडे सांडणी स्वार वाजे नौबत घनघोर
पालख्या अब्दागिरीनी उडविला भार...

ह्या हौसेमौजेबद्दल घर बोलणं करीत होतं. तोनशे साठ उदबत्त्या लावून, हंड्या-झुंबरं शिलगावून, हवईनळा न् फुलबाज्या पेटवून, रांगोळीत फिरकी पाट घाळून आणीक काय काय, काय काय करावं याचा बेत होत होता.

होय, एव्हाना मध्यरात्र टळून गेली होती. दुनिया झोपाळली होती. पण मी तुमच्या स्वागतासाठी जागी होते. रंगमहालीच्या भिंती सारवून जाईमोगऱ्यांनी घातलेल्या बिछान्यावर मी आपल्या हातानं आपल्या पायांना लोणी चोळीत रुक्मिणीमातेसारखी सेवा करावी का या विचारात होते. त्यासाठी मी हर्षाचे गुढे केव्हाच उभारले होते... आणि माझा राजा...

कृष्णदेवजी देवजी नवरा झाला
शिरी बाशिंग तुरा या ल्याला
मोडिव मंदील मंदील भगवान लेला
कृष्ण ग देवाच्या देवाच्या नवरीसाठी
तोडे घडविले घडविले मध्यानराती
पुतळ्या घडविल्या घडविल्या नानायापरी...

या शिणगारानं मिरवीत येणार होता. तर त्याची वाट पाहात नेत्रांच्या चंद्र-ज्योती लावून उभी होते.

या वेळी लाजरा मनोभाव, हसरी नजर, गणगोतांची माया, आई-वडिलांचं उदंड वात्सल्य, भावंडांचा चोखामेळा आणि माहेरच्या ओढीनं गुंफलेला जीव तुमच्याबरोबर सात पावलं चालायला अधीर झालेला एवढीच काय ती सोबत होती. म्हणताना उंबरठ्यावरचं माप ओलांडून गृहलक्ष्मी होत मी तुमच्या हातात हात देऊन यायला निघाले आहे, म्हणून म्हणते की, राजसा, आता येणं लवकर करावं. वाट बघून बघून माझ्या नेत्रांच्या कोरादेखील शिणल्या हं! आल्याबरोबर घरवाली कुठाय म्हणायचं बरं का? मी हसतमुखानं इथं दारी उभी आहेच हं माझ्या उगवत्या चंद्राच्या भेटीला!... आलं ना ध्यानात?



# ५



## स्वयंवर !

आमच्या दारीचं तुळशीवृंदावन तसं पाहिलं तर आमच्या मानानं फारच उंच ! त्यामुळं रोज पाणी घालावं म्हटलं तर हात पुरायचा नाही. आणि दरवर्षी श्रावण निघाला म्हणजे नवीन पायरी बांधूया म्हणतेल्या आजीच्या शब्दाला पण कुणी जागायचं नाही. म्हणून आमच्या गल्लीतल्या पोरी आमची टिंगल करायच्या, "पाणी नाही पोचलं तुळशीला तर चांगला नवरा नाहीच मिळणार ! बसा मग !" तशी आम्ही पण मग मनातल्या मनात खाऊन घ्यायच्या... दरवर्षी नव्यानं स्वयंवर उभारतेल्या त्या सख्या साजणीशी आपली हवी तशी दोस्ती होणार नाही या भीतीनं उगीचच मग खुळ्यागत व्हायचं !

पण परवा गंमत झाली. झापाळलेल्या डेरेदार तुळशीच्या मंजिऱ्या हालवून तिची मस्करी करीत "तुझ्या वृंदावनाला कसला रंग देऊ ?" असं विचारायची लहर आली. म्हणून वृंदावनाच्या पायाशी बसूनच मी बडबड केली, "कुंकवान, कुंकूपान, कुंकवाचं नेसणं, अर्धांगी बसणं, लेक कमलावती, सून सभावती, माझा नमस्कार ईश्वर पार्वती," तशी तुळशीखालच्या पाण्याचा झरा खळखळला आणि विंझण वाऱ्यागत कुणी तरी गुणगुणलं—

रुक्मिणीला साडी चोळी
सत्यभामाला दोरवा
तुळशीबाई तुला
थंडा पाण्याचा गारवा

सकाळी उठूनी मी ग
भाईर गेले सज
तुळशीबाईपाशी
पांडुरंगाचा वीणा वाजं.

तुळशीबाई तुझा
हिरवागार बाई शेला
सावळ्या गोविंदानं
येता जाता हालविला

तुळसाबाई बोलं
काय ग रुक्मिणी तुझा तोरा
माझ्या मंजुळाचा
देव मंदिली खवी तुरा

राही रुक्मिणी
भांडती तुळशीशी
हिरवा तुझा पाला
गोविंद का तुजपाशी

म्हणताना मान वर केली, तशी मला बघून आमच्या दारीची तुळस खुशीनं हेंदकाळली ! राजीखुशीनं तिच्या मंजुळा दरवळल्या आणि तिनं माझ्याशी पोटभर बोलणं साधलं. म्हणताना मी तिला सहजीच विचारलं, “ तुझं लगीन नेहमी नेहमी कसं ग तुळशी सखे? ” तर मेली तीन ताड नऊ माड उडत खदखदून हसली !...

मग मला राग आला. अमृताचं आळं घालीत जोपा केलेल्या हिनं

हसायचं म्हणजे ? अर्ध्या रात्री हिच्याकडे खेपा टाकून रानोमाळ पळतेला हिला पैस जागा देत अंगणात उभी करतेल्या गोविंदानं हिला फारच चढवून ठेवलीय ! नाही तर हिला पाणी घालतेल्या पतिव्रता नारीला हिच्या कुशीत हळदकुंकवाचा लाभ झालाच असता कशाला ? म्हणून मी पुन्हा तिला विचारलं, " शिड्या लावून लावून तुला भेटायला येतेला कृष्णदेव तुझ्या संगतीत एवढा रंगून जातो, म्हणून फार शेफारणं चांगलं का तुझं ? " त्यासरशी हालत्या डोलत्या मंजिरींनी कानगोष्ट केली. म्हणाल्या कशा--

तुळशीच्या बनी कसं झुळुझुळू पाणी
केल्यात आंघुळी नाटक्या ग गोविंदांनी

तुळसाबाई तुझ्या पानाला सुवास
देव गोविंद झाले खूष

डोंगर परवत साऱ्या कळसाला सोनं
देव वजनी भरत्याती एक तुळशीचं पान

एवढी दोघांची प्रीत. म्हणून तर पैस गळ्याच्या श्रीकृष्णदेवाच्या कंठाभोवती हिची हौसमौज. देवाची वाट पाहात ही उन्हातान्हाची एकली तप मांडून बसते. म्हणून देवाला हिची आगत दांडगी.

खरी गोष्ट कळल्यानं माझ्या मनीचा राग उतरला. अंगणात हिरवा शेला विसरून गेलेल्या जाईजुईच्या मांडवाखालच्या तुळशीला मग मी आंजारली गोंजारली... तशी मग अवचितच कुणाचा तरी गळा खरी गोष्ट देत सजला--

तुळशीबाईला नाही कुणी आईबाप
चंद्रभागेतीरी तिचं उगवलं रोप

तुळशीबाई नको हिंडूस रानोमाळ
गरतीबाई तुला जागा देते मी जवळ

तुळशीचं रोप लाविलं अंगुपती
कृष्णदेवा शेजारी ब्रह्मदेवाची वसती

तुळशीबाईला न्हाईती नाकडोळं
सावळ्या पांडुरंगाच्या हुरद्यावरी लोळं

बाई ग ! हिला ना आई ना बाप ! ना घर ना दार, ना रूप ना अप्रूप, तरी कृष्णदेव हिच्यावर फिदा ? मला तर बाई सारा खुळयाचाच बाजार वाटला.

म्हणून मग काय केलं की, पाची पांडवांची न् सहाव्या द्रौपदीची सभा अंगणात मांडली. हिरव्या शेणाच्या गौळणी त्यासाठी थापल्या. झेंडू मखमलीच्या फुलांचे शाल्ह–शेले गुंफले. पुरणावरणाचा नैवेद्य रांधला. हरतऱ्हेची रांगोळी काढली. उदकाड्या लावल्या. पूजा केली. पानं फुलं वाहिली आणि मग या सभेला विचारलं, " मिरगाच्या पावसानं धरतीवर उगवलेल्या ह्या तुळशी सखीचं न् रुक्मिणीचं पटत नाही म्हणतात ते खरं काय ?" तशी सगळी सभा हसलीच हसली. आभाळ गरजल्यागत आवाज आला म्हणताना तिथं अवचितच येतेल्या खुद्द रखुमाईनंच सांगून टाकलं,

माझ्या अंगणात उभी तुळस मालन
हिच्या सैंयवराला देव येती चालून

तुळशीबाई हिरवी तुजी जानी
भाळला गोविंद तुजला बाळपणी

तुळसीबाई तुझी मंजुळा कवळी
भाळले गोविंद बहू सुरत सावळी

पाठोपाठ पांडुरंगही आले ! जनलोकांचा धनी आल्यानं सभा गप्प झाली जशी. या पृथ्वीखंड सावळ्यापुढं कुणाची बोलायची छातीच होईना ! सगळे लागले पूजेला न् ध्यानधारणेला.

तशी मग मंजिरी हालवून मस्करी करतेल्या गोविंदाला तुळस लाजली अन् भगवान हसतमुखानं निघून गेले. त्यासरशी हळूच मी पुढं झाले न

तुळशीला विचारलं, "तुळशीसखे, माझ्याशी खरं बोलशील ?" तर तिनं मान डोलावीत 'हो' म्हटलं आणि त्या आधारावर मला वाचा फुटली. "आम्ही रोज अंगण झाडावं. सडा-रांगोळी करावी. सुवासिक फुलं वेचून आणावीत. घरातल्या देवाची स्नानसंध्या पाहावी. गंध उगाळावा आणि पूजा करून उरलेलं पाणी घेऊन ते तुला घालावं, पण तुझ्यापर्यंत हातच पोचत नाही ! मग तू का नाही खाली मान करीत ? नाही तर वृंदावनातून उठून हळूच का ग नाही घरात येत ?"

तेवढ्यात आमची आजी आली. तिनं तुळशीला पाणी घातलं. पानाफुलांनी पूजा केली, हळदकुंकू वाहिलं न् नमस्कार करताना म्हटलं कसं,

"तुळशी ग बाळ, तुझं अमृताचं आळं. शिपीन तुझी पाची मुळं. रामानं आणली, लक्ष्मणानं लावली. सीताबाईनं जोपा केली. सोन्याचा करंडा, रुप्याचं झाकण, ईश्वर पार्वतीची राखण. माझी सेवा देवा तुला इथंच करते अर्पण."

मी ऐकत राहिले. तुळशीला पाणी घालीत तिनं पुन्हा म्हटलं, "धरणीमाय, धरणी ठाय, तुला घालते जितं पाणी, ह्या कर्माचं साक्षात धनी नारायण. कृष्णासारखा भ्रतार द्यावा. नारायणासारखे पुत्र द्यावेत. लक्ष्मीसारख्या सुना द्याव्यात. घाऱ्या पुऱ्या भरला हरा न् वर झाकला शेला कोरा." खडीसाखरेचा नैवेद्य दाखवला. प्रदक्षिणा घालायला लागली. तिच्या पाठोपाठ मीही निघाले. तशी तिच्या मुखी ओव्या घुमल्या---

सकाळी उठूनी तुळशीकडेनं माझी वाट
तुळशीच्या कट्टयावरी वाची गोविंदा हरीपाठ

सकाळी उठूनी बाहेर गेले मी सजागती
दारी तुळस कुंकू लेती करंड माझ्या हाती

सकाळी उठूनी तुळशी बाईच्या पाया पडं
सांगते मैनाबाई शिळया कुंकवा रंग चढं

सकाळच्या पारी काय वाजतं भराभरा
रामराया माझा तुळशीला घाली वारा

सकाळी उठूनी केलं सडा सारवण
तुळशीखाली उभे देव सूर्य नारायण

माझ्या अंगणात तुळशीबाईचा बंगला
देव गोविंद रंगला शिड्या लावूनी चंगला

तुळशीबाई तू ग नको हिंडू रानीवनी
पईस माझा वाडा जागा तुला वृंदावनी

प्रदक्षिणा संपल्या. आजी वृंदावनासमोर उभी राहिली. तिनं हात जोडले. मीही हात जोडले. आजी घरात गेली. पण माझे ओठ पुटपुटले, " गेलेवते तुळशीपाशी. भेटले ऋषीकेशी. भावी पूजा बांधली. राधा दामोदर पूजले. तुळशीची सेवा घडो. रामनामाची वस्ती पडो..."

आणि काय गंमत म्हणावी ? तुळशीच्या पानानं मानवी रूप धारण केलं की ? तिच्यातून साईन संगीत माणूस निघालं अहो ! शिवाय त्या मुखाला वाचा पण फुटली--

अग अग तुळशी, मी एक आळशी
तुला घाली पाण्याची कळशी
तू म्हणशील केव्हा केव्हा
तर म्हणावं मला बनेल तेव्हा तेव्हा

आणि मग सगळ्या वृंदावनाला असं हसू फुटलं की, मी झाले पार शरमिंदी ! तुळशीपूजेचा माझा आळस चारचौघांत निघाल्यानं गेले लाजून. घातली खाली मान न् म्हटलं, " पाणी घालीन म्हणते रोज. पण हातच पुरत नाही मग काय करू ? "

तर मग तुळसच बोलली बाई हं ! म्हणाली, " अग, मी आपली माझ्याच नादात, बायका माझी पूजा करताना म्हणतात ते खरं अग ! "

" काय म्हणतात ? " मी बळंच विचारलं.

" म्हणतात की,

शंभो शिवहरा करीन तुझी सेवा
मोत्यांची राशी बारशी दिवशी
हातात बेलाचं पान मला लागलं शिवाचं ध्यान "

तिनं खरं ते सांगितलं, तशी तिलाही हसू आलं. माझ्याही गालाला खळी पडली... चुन्यानं रंग देऊन वर लाल लाल मातीची नक्षी वृंदावनाला काढायची न् मग ह्या राणीच्या स्वयंवराची तयारी करायची ह्या बेतानं माझी कळी खरंच खुलली. म्हणून मग तिथून पाय काढला न् बगिच्यातली फुलं वेचावीत या हेतूनं परड्याकडे पळाले तर तिथं आमची आनंदी !... तिथं उगवलेल्या तुळशीच्या रोपाला आजारीत गोंजारीत ती खुशाल गातेली—

ये ग तुलशी सकूबाई
का ग एकली बनामंदी
ये ग आपुल्या घरकुलात
ये ग आपुल्या गोकुळात
जागा देईन मांगल्या दारी
ये ग तांब्याच्या कळशीनं
पाणी घालूनी वाडवीन...

म्हणून मागच्या पावली परतले. तिला आपला ताप नको म्हटलं. गेले तशीच झम्माट्यानं गावातल्या विठ्ठलरखुमाईच्या देवळात. म्हटलं, विचारावं काय काय ह्या दोघांला. तशी अवचितच बाईमाणसाचा न् पुरुषाचा आवाज राऊळात घुमला—

रुक्मीन म्हणे शेला कशानं फाटला
गेलो तुळशी बागेत तिथं गुतला बेटाला

रुक्मीन म्हणे शेला कसा गार झाला
रात्री वाचीयीली पोथी तुळशीच्या निवाऱ्याला

रुक्मीन बोले देवा पिरत कोणाची
तुळस गुणाची तप घालिती उनाची

म्हणताना तिथंच उभी राहिले. देवादिकांच्या एकी आम्ही काय बोलावं ? आम्ही तर एकदा सोडून शंभरदा तुळशीला सांगितलेलं की—

तुळशी बाई हाल्ढ नको डोल्ढ नको
तुझी ग मंजीरी पायधुळी घाल्ढ नको

पण ऐकतो कोण ? तुळशीचं म्हणणंच मुळी की, हालल डुलल म्हणजे दाट तुळशी बनातून फिरतेल्या देवाला विंझणवारा आपल्या मनानं मिळतो. आता यापुढं काय बोलायचं डोंबल ? रुक्मिणीला तिचं सरळ उत्तर की,

तुळशी बाई म्हणे किती रुक्मीण हाटेली
तुझ्या जरीच्या पदरानं माझी मंजुळा तुटली

तुळशीबाई म्हणे रुक्मीणी कशीयानं थोर
आधी लेली माझी वाळं मग मांडीले स्वयंवर

तुळशीबाई म्हणे रुक्मीण कशीयानं मोठी
आधी ल्याली माझी कंठी मग बरम्यानं दिल्या गाठी

हिच्या पायाशी राम पोथी वाचायला सदाचाच उभा न् हिच्या भोवती विठूदेवाच्या नित्य नियमानं फेऱ्या घालणं तर का म्हणून हिनं कुणाच्या बोलण्याला भीक घालावी ?

रुक्मीण बोलती देवा येतो मला राग
तुळशीची काळी माती शेल्यालाही डाग

हे रुक्मिणीचं फणकारणं ऐकलं की, तुळस बोललीच म्हणा,

तुळस म्हणीती रुक्मिणी ग तुझा तोरा
आधी ल्याली माझा तुरा मग गेली स्वयंवरा

आणि म्हणून तर तिच्या नाकावर टिच्चून हिचं दरवर्षाला स्वयंवर उभं ! आणि आम्हाला पण हिचं कवतिक ! आम्ही तिचा डेरा रंगवतो काय, फुलांच्या माळांनी तिला सजवतो काय, हिरव्या बांगड्यांनी न् भर्जरी वस्त्रांनी हिला नटवतो काय; रायआवळे, चिंचा, बोरं असलं काय काय आणून हिची ओटी भरतो काय, सारंच जगावेगळं ! पण तिला अहंकार नाही हं कशाचा ? देवाच्या गळयाला भार होस्तोवर हिची त्याच्या कंठावर खुशीनं वस्ती. मग कुणी काही म्हणो. रोज उजाडलं की हमखास—

सकाळी उठूनी चला सयांनू दळायाला
तुळशीच्या कट्टयावरी आला गोविंद खेळायला

हे दिसणारच ! म्हणून लोकांना नित्याची पंचाईत की—

तुळस पतिव्रता कुण्या सावकाराची बाळ
देवा माझ्या विठ्ठलाच्या हृदयावरी खेळं

पण मग हे कोडं न सुटल्यानं म्हणूनच लोकांच्या मुखी तिचं माहात्म्यही ! देवाचा सहवास जिला नित्याचा ती आपल्या कुळीचा उद्धार करणार ही खात्री !

तुळशीचं आळं घातलं की, पातकांचं काळं होतं. तुळशीच्या मातीला स्पर्श केला की, सारी विघ्नं पळून जातात. तुळशीला नैवेद्य दाखविला की, पंढरीला जाणं होतं न् प्रसंगी साक्षात पंढरपूर दारी येतं अशी या लोकांची समजूत ! म्हणून तुळशीची पूजा आणि आमच्या मातोश्रींचं ज्याला त्याला अशाएकी सांगणं की, “शंकर पुशी पार्वतीला. स्वर्ग लोकी कोण जातंय ? धरणीची पूजा करते ती जातेय. पार्वती विचारती, धरणीची पूजा केल्यानं काय होतं ? शंकर म्हणतात, अंत:काळी महाविष्णूचं दर्शन घडतं. सोळा सहस्र गाई गोप्रदान दिलेलं पुण्य घडतं. म्हणून तुळशीची रोज पूजा करायची. तिच्या स्वयंवराची हौसमौज करायची. उसाच्या मांडवात तिचं लगीन लावून द्यायचं.”

तर बाई कुणाला काय म्हणायचं ते म्हणू दे. आपण आपलं ही तुळस रोज पुजावी. तिच्याशी गुजगोष्टी कराव्यात आणि मोठ्या माणसांप्रमाणं " तुळशीची माती, घेईन बोटी, लावीन पोटी, लेईन लल्लाटी, " असलं पुटपुटत एक औषधी वनस्पती म्हणून तिची जोपा करावी म्हणजे त्यात सगळं आलं असा विचार केला. घरी गेले. वृंदावनीच्या तुळशीचा पाला खाल्ला, मनोभावे तिला नमस्कार घातला न् तिच्याशी बोलत बोलत पाय दमस्तोवर तिच्याभोवती प्रदक्षिणा घातल्याच घातल्या !...मग कुणी काही म्हणो बापडं !...



# ६



## शब्दानं शब्द वाढतो

कितीबी ठरवलं न् कसाही विचार केला तरी लगीन निघालं म्हटल्यावर घरात थोडी तरी बाचाबाची झालीच पाहिजे हे जणू ठरलेलं. आमच्या धाकट्या मामीच्या राधाचं लगीन झालं झोकात, पण बाई रुखवताच्या वेळी धमाल उडून गेली. एकेकीनी असा उखाणा टाकलाय म्हणता की, पावण्या-रावळ्यांच्या पाया पडून माफी मागताना भुई थोडी पडली !

" आला आला रुखवत, त्यात हुती पुरी, यिहीनीच्या नाकापरीस नथीचंच वजन लई भारी " असा आमच्या किष्णावैनीनं उखाणा घातल्या-बरोबर पावणीबाई भडकलीच भडकली. नक्षत्र माळांनी सजवलेलं भोवलं हादरलं. हिरव्यागार आंब्याच्या डहाळ्यांनी लकाटलेला मांडव चमकला. पावणीबाई लालबुंद झाल्या. त्यांनी सवाई उखाणा फेकला किष्णावैनीच्या तोंडावर. म्हणाल्या कशा,

" आला आला रुखवत त्यावर ठेवली चंची न् लोकांची डागिनं घालून मिरवितेली पावणी कोंची ? "

झालं ! तापल्या तव्यावर मग लईच लाह्या फुटायला लागल्या. रुखवताच्या दुरड्या या दणक्यानं गरकल्या तरी बायकांची तोंडं वाजलीच वाजली ...

" आला आला रुखवत, त्यात होता तवा, यिहीनीनं लुगडं धुतलंय पानीपतची लढाई झाली तवा ! "

" आला आला रुखवत, त्यात रुपये होते काठोकाठ, तपकीर वढताना यिहीनीला नाकात बोटं घालायची सवय लई भरमसाठ. "

" आला आला रुखवत, त्यात हुती गोण, आमी जमीन दिली तरी तुमच्याकडं करणारच हाय कोण ? "

" आला आला रुखवत, त्यात हुती शेपन्नासाची नोट, यिहीनबाई मागत्यात घालायला पँट न् कोट ! "

" आला आला रुखवत, त्यावर हुतं जांबुळ, आमच्या नवरीला नीट सांबाळा न्हाईतर आमचा भैरूबा लई हाय वंगाळ. "

म्हणताना मंडपातली हवा झाली लई तंग. एकेकीला मागं व्हा म्हणीत बापई माणसांनी मधी पडायची वेळ आली !... नवरीकडच्या लोकांनी हौसमौज करून दुरड्या भरून काय काय आणलंवतं त्याचा हिरमोड झाला. नवऱ्याकडची माणसं तंबली. हाराडेरा आणा म्हणाली. उणंदुणं काढायचंच तर आम्ही पण कमी नाही म्हणायला लागली. ताशा वाजंत्र्याच्या भडीमारानं वाजत-गाजत आलेल्या दुरड्या मग एकेकीनं हेरल्या. मांडवात गर्दी झाली. झाडून सगळं शेलकं वराड जमलं. बायकांना चेव आला. म्हणताना एक जण जरा जाड्याल्याशी होती ती पदर सावरीत सावरीत पुढं आली न् खाकरून तिनं दुरडी उघडताना भाषा केली,

" आला आला रुखवत, आळीबोळांनी, यिहीनीचा कान खाल्ला जित्रापातल्या टोळांनी !... "

त्यासरशी आमच्याकडच्या सखूमावशीनं केला जोर. रुखवतातली चकल्याची दुरडी उघडताना सर्वांना हळद-कुंकू लावून न् स्वतःला पण ते लावून घेत म्हणाली कशी—

" आला आला रुखवत, त्यात हुती पणती, आमची यिहीनबाई उगचच बेडकावानी कणती. "

अगोबाई ! मग असा हशा पिकला आमच्या अंगाला न् असा राग फणफणला पावण्यांच्या मधी की, हसावं का रडावं यातलं गणित बसेनाच काही केल्या ! बरं झालं बाई गेलं गंगेला मिळालं म्हणून नाहीतर केवढा घोळ ? तशात आता पुरं झालं म्हटलं तरी ऐकतंय काय कोण कुणाचं ? एकेकीला आली ईर्षा. अशी तशी नव्हं तर वाघ चावताळल्यागत ! तशी आम्ही मध्येच तोंड घातलं—

" आला आला रुखवत, जाईजुईचा, आयाबायांनू नका उणं बोलू, रुखवत आमच्या आईचा. "

पण कुठलं आलंय ? लग्नात असाच दणका उडला पाहिजे, न् शब्दानं शब्द वाढलाच पाहिजे, असं दरडावून सांगत आमच्या किसाआज्जीनं दिला एक बाण सोडून थुईऽऽ करीत न् म्हणाली,

" आला आला रुखवत, रुखवतावर हुता गोण्या गोण्या लसूण, तुमी ढीग मागचीला मोटार पण आणावी आमी कुठून ? तवा जावा तुमी कैकाड्याच्या गाडवावर बसून ! "

अरे देवा ! हा उखाणा नवऱ्याच्या मावशीला लई म्हणजे लईच झोंबला. पदर नीट आवरीत ती पुढं आली. सगळ्यांना तिनं न्याहाळलं. इकडं तिकडं पाहिलं. खाकरली न् म्हणाली कशी.

" ऐका. न्हाई लागत पैका. अंबारीच्या हत्तीला रेशमाचा कोरडा. यीन मागती चैत्रमासात हिरवा चुडा. मांडवाच्या दारी शिद्याची पाटी इहीनीच्या कपाळाला पडली लई आठी. आता ही आठी कशानं काढू मी म्हणते ? बारा भुयांची पालखी हिला धाडू काय ? पण यीन म्हणती मला कशाला पालखी ? मी तर तुळशीच्या फुलावानी हलकी. यीहिनीनं सहज दिली पालखीला मांडी तर मोडली पालखीची दांडी ! म्हणून यिहीनीला तोलली तर तवा ती भरली सव्वा खंडी ! ! "

छे ! ह्या उखाण्यानं सगळ्या मंडपात गेला हसण्या–खिदळण्याचा गदारोळ उसळून. पण आमच्या चंद्रीकाकूला हा उखाणा डसला. लई फणफणली. बघून घेईन तरच नावची म्हणाली न् दिला तिनंही मग

यापेक्षा भला दांडगा बार उडवून.

"आला आला रुखवत त्यावर टाकलं बुंदीचं गोळं, पाटलाचं वराड उकीरडयावर लोळं."

त्यातून मग अशी चिरड निघाली की, यंव रे यंव ! विहीणबाई रागानं फुस्कारल्या. त्याचा परिणाम मग बरा झाला नाही. आमच्याकडची एक पावणी दोडक्यागत फुगून पुटपुटली,

"समोरच्या कोनाडयात ठेवलं फूलपात्र, नवरी आमची नक्षत्र पण नवरा मिळाला मेषपात्र !"

कवसकुल्ल्या लागाऱ्यात त्या रीतीनं हे बोलणं पावण्या माणसांना झोंबलं. त्यांची तळपायाची आग मस्तकाला गेली. म्हणून त्यांनी शांतता धारण करावी ह्यासाठी मी बोलून गेले,

"रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर मोर, नवरा सूर्यबाण तर नवरी चंद्राची कोर."

मग कुठं चिडल्या हवेनं किंचित उसासा टाकला. बायकांनी पदरानं स्वत:लाच वारा घातल्यागत केलं. नवरीसंगं रुखवतावर दिलेली भांडी पाहिली. त्यातल्या पितळेच्या पिंपावरची नक्षी त्या मंडळींना आवडली. सोळा पाकळ्यांची समई एकेकीनं उचलीत खालीवर बघितली. आणि मग नाजूक, देखण्या करंज्यांची दुरडी उघडताना एकजणीनं उखाणा टाकला—

"कोरी तवली कुंभाराची, विहीन बोल टचकाऱ्याची. कोरी चिरडी करदुरीची चित्तांगाचा फासा. यिनीबाई पलंगावर बसा. तर बाई याह्यांनी यिहीन घेतली कडं न् न्हेली हलवायाच्याकडं ! तितं बांदलं जिलीबीचं पुडं, यिहीन फुंदू फुंदू रडं. मला तिकडंच न्या म्हणं. याह्यानी पुना यिहीन घेतली कडं. न्हेली सोनाराकडं. तितं घडविलं सोन्याचं तोडं, मग न्हेलं आताराकडं. तितं बांदलं हळदकुंकाचं पुडं. याह्यांनी यिहीन न्हेली आंब्याच्या वनी. तितं हातारला गंजीखाना यिहीनीला याही आला मना. म्हन बसायला दिला पाट. त्वांड धुयाला दिलं घंगाळ. तर बाई यिहीन

म्हणती कशी, याही लई मंजी लईच बेंगाळ ! आता वो ? ''

मांडवात पुन्हा गडबड झाली. बायकांनी एकमेकींना चिमटलं, ह्या अंगाच्या त्या अंगच्या एकमेकींत कुजबुजल्या. तशी उखाणे पुन्हा निघाले एकापेक्षा एक सरस—

" रुखवत आला रुखवत आला रुखवतावर ठेवली मेथीची भाजी पण यिहीन घाङ्गन मिरवतीया ती नथ माझी.''

" रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर तीनशे पापड, ऐंशी वडा, कोन रुखवत उघडा म्हणतील त्येचं नाकच धरून वडा ''

" शिवरात्रीचं पारणं करते जीवाच्या कारणं. नऊ नारळ बत्तीस केळं, दराक्ष हंजीर सीताफळं. काशी भोपळा यीहीनीनं केला फराळ. बळं बळं खाल्ली, पाटीभर केळं. पोतंभर भगर. पोट फुटस्तोवर खारका, मग यिहीन गेली मळ्याला. एक रसाची घागर पेली, एक गुळाची ढेप खाल्ली. पोतंभर शेंगा फोलल्या, मणाच्या लाह्या गिळल्या, यिवाहीदादा आता जाताय तुमी खजुरीचं झाड आणायला का बसावं आमी धपाटं खायाला ? ''

" रुखवत आला रुखवत आला मांडवाचे दारी, आता काय काय परी शेवया सरी. शेवया नाजूक. तेलच्या साजूक, पानाच्या पट्या. खोबऱ्याच्या वाट्या, गुळाचं खडं, उडदाचं वडं. पापडहार हारी. सजुरी घारी, बुंदी बरफी झुलाप झारी. जिरं साकार रायपुरी. शेंडी सकट पाच नारळ. देठासकट पिकली केळं दराक्ष हंजीर रामफळं. करणी केली धनसंपत्तीच्या बळं. रुखवत उघडते खडाखडी आणिक पाईजे तर...रावांचं नाव वर घेते पण अगोदर रुखवतावर ठेवा चोळीपातळाची घडी. ''

पण आता चिडाचीड जरा निवली. हसणं खेळणं वर आलं. हौसमौज निघाली.

" रुखवत आला रुखवत आला रुखवतावर होती आरती, आता उघडून बघते तर शंकरपार्वती.''

फराळाच्या जिनसांच्यासंगं. मांडलेल्या दुसऱ्या गोष्टींची विचारपूस व्हायला लागली. त्यातूनही हे नाही, ते नाहीचा बोभाटा झालाच. त्यामुळं

मग आमच्या चंद्रीकाकूनं नवऱ्याकडच्या लोकांना सुनावलं बेलाशक–

" आला आला रुखवत त्येला चार घोडयांच्या टांगा. टांग्याच्या मोडल्या खिळा. घोडयाच्या गुमावल्या घुंगुरमाळा. मी काय यीन करनीची न्हवं काय ? करायचीच हुते आनीकबी काय काय काय करीनच म्हणते..."

आणिक दिल्या की या उखाण्यात शेकडो जिनसा या परीनं हिकमतीनं गुंफून ! त्यासरशी सारा मांडव लई हसला...हसून हसून लोळण फुगडी खेळावा म्हटला..., त्यातल्या त्यात यिहीनीला घीन म्हटलं लुगडं जरीकाठी तांबडं तर युवायाचं मेलं शंभर कोंबडं...या कल्पनेनं पोट धरधरून हसायला आलं. लहान थोर सगळीच हसली...मांडवात खुशीचं वातावरण पसरलं. बायका-माणसांनी मग रुखवत घेऊन आलेल्या दुरडया एकदाशी उघडल्या आणि आल्या जिन्नसांपैकी सगळं पावण्यांना वाटावं म्हणून त्या दुरडया मांडवातून घरात नेताना आमची आई गालात हसत बोलली,

" आला आला रुखवत, रुखवतात चांदीसोन्याचे गडू, नवरा नवरीचं लगीन लावायला आले तेहतीस कोटी देव तर वाट सोडा बघू ?"

लोकांना हे बोलणं आवडलं. माणसं देवाचं नाव निघताच हात जोडून पाया पडली आणि मग प्रत्येकाच्या मुखी एकच भाषा निघाली,

" ब्रह्मा, विष्णू शंकर येती, नवरानवरीचं लगीन लावून जाती.
उमालक्ष्मी, पार्वती येती, हळदीकुंकवाचं वाण देती."

मग लोकांच्या पंगती बसल्या. रुखवताच्या सगळ्या दुरडया पत्रावळीवर मोकळ्या झाल्या. नवऱ्याकडची माणसं चवीनं जेवायला लागली. तशी पंक्तीला वाढतेल्या आमच्या भैनक्कानं ज्याला त्याला सांगितलं–

" रुखवत आला रुखवत आला, रुखवतावर मोत्यांचा हार. आमची नवरी लई सुकुमार तर तिला सासुरवास करू नका फार."

ते ऐकून नवरा मुलगा खुलालला, मानेनं 'नाही' म्हणाला. आम्हाला त्यामुळं एकदम कसं बरं वाटलं.

आग्रह करून करून पंक्ती वाढल्या गेल्या. रुखवत सर्वांना चविष्ट

वाटला. आमचं पोट भरलं. आमचा सुगरीणपणा पटला गेला यातल्या आनंदानं ऊर दाटून आला. मन समाधान पावलं. त्या नादात ऊसमळा, पानमळा आंदण द्यायची लहर मनात खेळली... " आम्हा घरीचा पाळणा तुम्हा घरी बांधीला " असं म्हणायचा मोह झाला. राघेला उदंड चिंतून आम्ही मग तिच्यावरून मीठ मोहऱ्या उतरून टाकल्या.

■

# ७



## तोळबंदीचा भोवरा

सोन्याच्या आडाभिंतीचं आणि हंडयाझुंबरांच्या लखलखाटाचं आमचं घर उभंकुडवी सारवून झालं आणिक कानपट्टीच्या रुमालासकट घरातील सगळी धुणी धुऊन झाली तशी त्या दिवशी माझा जीव खाली पडला. चार दिवसांवर आता दिवाळी आली होती तर चटूदिशी फराळाचं जमेल असं वाटलं. मन निर्धास्त झालं. म्हणताना दारात रोजच्या सडारांगोळीची तयारी करून झाल्यावर गुंजावणी डोळ्यांच्या रुणझुणत्या पाखराबरोबर मी आपल्या माहेरी निरोप धाडला. मला हे दांडगं पाठबळ होतं. म्हणताना

एकापुढं एक मायमालणी तुमचे लेक
मोत्यापवळ्यांचं झालं समींदरी पीक

हा आनंद मी भर्जरी शेल्यातून वर काढला. आमच्या नणंदबाई कितीपण तालेवारीच्या असू देत, नाहीतर त्यांची कुर्रेदारी कितीपण नटू दे, इथं काही कमी पडणारच नाही म्हणावं. माझ्याजवळ पण दुप्पट कुबेरी नू चौपट हौसमौज आहे तर दिवाळसण चार लोकांत उठून दिसू दे या त्यांच्या सांगाव्याला मी कशाला ते भ्यावं ? खरं तर–

चिकणी सुपारी दाटली आडकित्त्याला
राणी अभंड भेटली सावळ्या ग नंदाळ्याला

असली गोष्ट आमच्या दिवाणसाहेबांची. लेक तिथं द्यायची म्हणजे डोईवर टांगती तलवार चोवीस तास! पण त्यांच्या पोटीचा किराणा इतका चांगला की, त्याच्यावरून मी आपला जीव ओवाळून टाकावा. म्हणून जावई केला वकिलाला. आणि आता काय दिवाळसणाला भिणार म्हणता मी? छे ग बाई! त्याच्यासाठी काय वाटेल ते करून मी शेवाया, बोटवं, गूळपोळ्या, पुरणपोळ्या आणि वर केळीचं शिकरण असले जिन्नस करून पाची प्रकारांच्या ताटाला तूप भिनवीन तरच नावची. उलट ह्या खेपेला–

जेवण जेवतो तूप खिचडी पापड
जावई राजसाला घरला जायाची निकड

त्यांनीच असला घोळ घालू नये म्हणजे झालं. पण बाई बोलायचं कुणी? इथं तर–

मावळ्याच्या घरी भाचा पाव्हणा अरेराव
कोणी काढावं त्याचं नाव

अशातली गोष्ट. आले जावई पाव्हणे की, चवरंग टाकून मोकळी होईन आणि अंगठीवरल्या ह्या खड्याच्या गळ्यात पाच पदरी कंठी घातली की कशाला कोण नावं ठेवील मी म्हणते? कसं? शिवाय आमच्या घरात–

पाच दुरड्या रुखवत वर जरीची फडकी
यिहीन नणंद लाडकी

असलाच रुबाब ठेवला मी लग्नात. त्यामुळं माझ्या मोतीचुऱ्याच्या कळपातून सासरी जरी केळीची कंबळं निघाली तरी माझ्या आधी त्यांच्याच गालावर लिंबू फुटलं! देवाशपथ! तशी मग–

नणंद आक्काबाई नणंदपणा नका दावू
सोन्याच्या करंड्याला मोत्याचे घस लावू

असलं बोलणं जिभेवर आलंवतं तरी मी ते माघारी ढकललं. कारण–

यीबाया परास मला आगत यिहीनीची
भूक जाणील तान्हीची

अशी मला खात्री होती. त्यांच्या म्हणण्याप्रमाणं आम्ही जाईजुईचा मंडप घातला होता आणि मांडवाला केळीच्या मेढी लावून वर भावलं केलंवतं तर तिथं ऊस गुंफला होता. लेकीच्या पायातील पैंजण बुडावेत असा तिथं गुलालाचा भडीमार केलेला आणि विहिणीला हळदकुंकवाची पायघडी घालून वर भर्जरी पैठणी आहेराला दिलेली. कशाला काही म्हणून काही कमी पडूच दिलं नाही त्या वेळी तर तीच मी आता आळस करीन काय? मी पण विहीण करणीचीच आहे म्हणावं, म्हणून तर–

गादीवर बसणार हिरव्या शालूत तुरा खोवी
लेक मैना त्याला द्यावी

असला बेत मी मनात लेकीच्या जन्मापासून केलावता ते! खरं ना! ज्या राणीनं लेक-जावयाची शेज मोत्यापवळ्यांनी भरली तिला हो काय कमी पडणार? मी दैवाची देणारीबी न् घेणारीबी! बघा, बघा पाहिजे तर.

हे रायभान सारंग जन्माला आले त्या वेळी सोनाराच्या शाळेत ठिणगुल्या उडाल्या. रातोरात बिंदल्या तयार झाल्या. रत्नखचित पिंपळपान घडवलं गेलं. गळ्यात वाघनख. कमरेला साखळी. भावनेला उधाण आलं. हौसेला बाळसं चढलं. बाळ रुपागुणानं थोर निपजला. तुपात भिजवलेला बत्तासा खाणारा झाला. विट्टीदांडूला ह्यांनी घागऱ्या बसविल्या या जावयाच्या! खरंच, जाईमोगऱ्यांच्या कळ्यांनी राजाच्या पतंगाची दोरी सजली. त्यासरशी माझं अंगण समुद्रतळीच्या मोत्यांप्रमाणं झळाळलं न् आनंदाची कारंजी उसळली... मी तिथं दाट सडा घातला. पायाला खडे बोचू नयेत म्हणून. पोराबाळांच्या वर्दळीनं घर साजिवंत करावं म्हणूनही. त्या वेळी कोण कोण म्हटलं पण हं की–

श्रीमंतीचा डौल तुझा पुरे कर
सोनेरी चंद्रकोर तान्हा बाळ

पण बाई, बाळाच्या कोवळ्या लावण्याला भर आला तशी मी पण समाधानानं मोहरून गेले. गझनीच्या कापडाची कुंची शिवली. जरतारी अंगड-टोपडं केलं आणि तेव्हाच हा जावई पसंत करून मी माझी हौस भागवीत त्याच्या टोपीला गुलाबाची फुलं खोवली देखील! गोऱ्या राजसाला ते देखणेपण असं साजून दिसलं की, काय सांगावं?

तर आता हे जावई येऊ देत. खरंच येऊ देत. येसबंदाचा झुबका दारात टांगून ठेवीन आणि लिंबलोण करून टाकीन दृष्ट होऊ नये म्हणून! एवढंच नाही तर मी आपली काया त्याच्यावरून ओवाळून टाकीतच–

माझे हे आयुष्य उणे करी गणराया
घाल सखीच्या चुडेया चंद्रिकेच्या

असं आवर्जून म्हणेन. त्याला प्रेमाश्रूंनी न्हाऊमाखू घालीन. आणि लेकीला सांगेन,

प्रीतीच्या जावयाला देऊ करा ताटवाटी
बाळे सारे तुझ्यासाठी चंद्राबाई

माझी पोर पण नाजूक आहे. दृष्ट काढावी अशी सुरेख–

नवऱ्या परास नवरी उजळत
सोन्याचे तिला गोठ शोभताती

करवंदी मोत्यांची नथ लाखाच्या मालकीची
कोवळ्या नाकाची बाळ माझी

दागिन्यांनी वाके जशी लवली ग केळ
नाजूक फूलवेल राणी माझी

तोडीच्या वाक्यांनी शोभती दंडभुजा
फाकली तेज:प्रभा बाळायीची

ठुशापेट्यांखाली तन्मणीला बारा घोस
दिल्या घरी सुखी आस चंद्राराणी

तिचं पण दिवाणसाहेबांना कोडकौतुक. मग मीच का माघार घेईन ? पाहिजे तर आता देखील हत्ती, घोडे, पालखी यांतलं हवं ते पाठवते. पानमळ्याच्या टिपरीखालनं नवराबाळ येऊ दे मिरवत. कोण मागं घेतंय बघू या !

आणि माझ्या चंद्रावळीला हिऱ्याची अंगठी, साखळ्या, तोरड्या, कंगण्या-तोडे, वाक्या, बाजूबंद, सवाई नक्षीची कंठी, चंद्रहार, पाच पेट्यांचा कमरपट्टा, सरीबिंदली, जाळीच्या मण्यांचं गाठलं, नाजूक मोत्यांचे काप, नक्षीदार झुबे, बाळ्या-बुगड्या-सर्ज्याची नथ असलं काय काय घालून अशी सजवीन की, दिवाणसाबांनी बघतच राहिलं पाहिजे.

अगबाई, उगवल्या सूर्यागत आमचा हा जावई सारंगधर लग्नमंडपात यायचा म्हणजे लोकांची नजर त्याच्यावरच खिळायची की देवा ? जसा काय श्रीकृष्णच रुक्मिणीहरण करायला आलाय समजावं ह्या भावनेनं पानवंताच्या नारी गीतं गातील आणि मग—

चारन, बोर, आवळं, कोइर, केकत, केवडा
मुद, राकडी माथ्यावर
वर काय जडिताचा घुंगुर
सोबतो मनोहार
जसा काय उगावला दिनकर
बाळीन् बुगडी दंडी मासुळी
येल बाळी पान बाळी
जडित बाळी जोड बाळी
कापाला जागा कमी
मणी मंगळसूत्र गळसुरी, ठुशी वजरटीक
चिंचपेटी इतकं लेला जरी
वर काय घातली गळसुरी
रत्नजडित जवार मनोहार

जसा काय उगावला दिनकर
हनुवटी मिच्च्या पायी पोलार
साकळ्यावरी वाळे दंडामधी दंडसर
हाती बाजुबंद सुंदर घातिला हातसर
जसा काय उगावला दिनकर

ह्या डामडौलानं आमच्यासकट उभ्या मांडवाचा जीव हारखून जाईल. मग मीठ-मोहऱ्यांनी दृष्ट काढता काढता येसबंदाचा तुरा दारी लावणाऱ्य मालकांची पण माझ्यागतच धांदल उडून जाईल. छे ! ही सावळी सुरत नको बाई कोमेजून जायला. अंहं ! त्यापेक्षा लेण्यानटण्याची फाजील तालेवारी मेली नकोच कशी. जाऊ दे. आपल्या नजरेलाच भुद्ध नको म्हणून सांगीन न् होईन मोकळी. तर काय मेलं ?...

दिवाणसाब येऊ देतच. बघा म्हणावं मग तुमच्या भावाच्या घरची ही भावजय काय काय हौसमौज करतीय ते...

देवीला मी खणानारळाचं वाण देईन. विहिणीला चौरंगावर बसवीन. भर्जरी पाठ घेऊन मिरवू दे सखीला असा आहेर करीन. तिचंच हे घर. तिचं नवसाचं बाळ आमचे जावई झाले. माझी हौस भागली. मी सुपानं दान करीन. दुरड्या भरून फराळाचं करीन. इष्टमित्र बोलावीन. चंद्रज्योती लावीन. पंचारतीनं ओवाळीन. मात्र या वेळी—

मावळण आत्याबाई तुमच्या हाती दूध पेढे
खाऊ मागाया येई पुढे सूनबाई

हा पण डामडौल बघून आमच्या नेत्रांचं पारणं फिटू दे. आणि दिवाणसाहेबांनी पण एक लक्षात घेऊनच इथं पाऊल टाकावं हं ? म्हणावं की—

लेकाच्या आईला नाही कशाचा दुकाळ
सांगते वन्संबाई पाणी हौदाला बक्कळ

पुत्राच्या जिवावर मोत्यापोवळ्यांची जहागिरी लुटणाऱ्या मायमालणीनं हौसेनं यावं. आणि म्हणून माझं काय म्हणणं की, इथं माहेरात पाऊल

टाकताना त्यांनी भाग्यवती होऊन यावं. देवी पार्वतीप्रमाणं धनदौलतीच्या आरोग्यआबादीच्या, हौसेमौजेच्या, मोठ्या मनाच्या, हिऱ्यामाणकांच्या तेजाच्या अशा चालीनं यावं.

रायभान बाळाला हिरवा मंदील आणावा म्हणते. म्हणजे मग हा माझ्या ताळेबंदीचा भोवरा आपोआप—

शिरी मंदील लेतो बाळराजा देखणा
शहराचा रहाणार खेड्यात झाकेना

या बोलवाल्यानं गावभर ओळखीचा होईल. एवढंच नाही तर हे म्हणतील कसे—

जरीचा मंदील देतो फिरकी फिरकीला चांदू
तुला शोभेल तसा बांधू भाच्या बाळा

आणि मग मी पण बसायला रत्नजडित सिंहासन मांडून—

पानखातवऱ्या पानं खाशील तेवढी देते
लाल गुजरासाठी पानमळ्याची खोती घेते

असा धडाका उडवून देईन. अशा वेळी—

सावळी सुरत सासू बघते चोरून
माझा बाळराज चंद्र काढीला कोरून

असं नाही दिवाणसाहेब म्हणाल्या तर कशाला पाहिजे? माझ्या हौसेला ह्यांचा केवढा आधार म्हणून सांगावा? ठेवणीतल्या सगळ्या भावनांचे मालक ते. खजिन्याची पेटी ते. जिवाभावाची धनदौलत ते. तर मला काय उणं राहावं?

आईच्या परास सासूबाईचा उपकार
सासुमालनीनं दिला पिर्तीचा चंद्रहार

असं माझं नशीब मोठं. सगळ्यात सगळं. आगळं—आणि आमच्या दिवाणसाहेबांचं पण म्हणणं की—

भावजई गुजरीचा तिचा पदर धरणीचा
भाऊराज माझा खांब कातीव कोरणीचा

बास झालं मग. यापेक्षा आणिक काय पाहिजे ? तर माझं म्हणणं की, मुद्दलापेक्षा व्याजाचीच लज्जत वाटावी तसं मायमाहेर ह्यांना व्हावं. मग माझ्या लेकीला काय कमी पडलं तर पडू दे. तिचं केव्हाही पाहता येईल. आता या दिवाळीला खरा मान काय तो जावईबाळाचा ! नव्हं खरं का खोटं ?

■

# ८



## बाळलेणी

मोत्यापोवळ्यांगत वाटतेल्या नाजूक ओठांचं, टाळांच्या टोपणागत दिसतेल्या टपोऱ्या डोळ्याचं, कर्दळीगत वाटतेल्या रेखीव काजळतिटीचं, मऊ सूत वाटतेल्या नाजूक कायेचं, भुरूभुरू उडतेल्या जावळाचं न् उमलत्या गुलाबागत दिसतेल्या देखण्या बाळानं आपल्या अंगाखांद्यावर रमताना खाली उतरत घरभर खेळखेळ मांडला म्हणजे जीव कसा हारखून जातो. अंगडीचं बाळराज घोंगडीचं झालं न् अंगुपती खेळायला लागलं म्हणजे पडत्या उठत्या त्याच्या चिमुरड्या धावण्यापाठोपाठ आपणही धावायचा मोह होतो. अशा वेळी या बाळराजाला मांडीवर घेऊन गोष्ट सांगावीशी वाटते. त्याच्या कानाशी गीत गुणगुणावंसं वाटतं. त्याच्यासंगं खेळ खेळ खेळायची लहर येते. त्यामुळं हे बाळराज मग आपल्या जीवनाचं सुखनिधान होतं न् मग बोबड्या बोलाचं लेणं लेत पोरात पोर होऊन आपणही बडबडत सुटतो–

इथं इथं बस रे मोरा
बाळ माझं घालतंय वारा
चारा खा रे मोरा
पाणी पी रे मोरा
एक पाय नाच रे मोरा...

त्या कारणानं लक्ष देऊन हे गीत ऐकतेलं सोनुलं खुद्‌किनी हसलं, डुललं, नाचलं अगर टाळी वाजवीत सुटलं की, आपला जीव भारी हुषारीत येतो. वेचक्या शब्दांनी गुंफलेलं टीचभर गीत त्याला लाभलेल्या ढंगदार सुरावटीनं मग झोकात रंगत जातं... वयाचं न् काळवेळेचं भान विसरून मग आपल्यालाही आपलं बाळपण लक्षात येतं. आपणही त्या बाळा-सारखंच हसत नाचत आणखी काही गुणगुणावं म्हणतो—

अरिंग मिरिंग लवंगा तिरिंग
लवंगा तिरिंगचा डुगडुग बाजा
गाई गोपा उतरला राजा

तशी पुढ्यातलं छकुलं हातपाय उडवीत न् डोळे मिचकावीत बसल्या बसल्याच असं झोकात नाचतं की, ते बघून आपला जीव खुळाभैरा व्हावा! चुटकीसरशी हे बाळ उचलून त्याचे मटाटा मुके घ्यावेत न् मग त्याच्या सकट स्वत:भोवती गिरक्या मारीत आपण खुशालीत येऊन म्हणावं—

अडगुलं मडगुलं
सोन्यानी गुंफीलं
डोंगरी किंकरी
वाजवी श्रीहरी
लपत छपत
बांळ घरी आलं
दुरूनी देखीलं
खुणेनी ताडीलं

आणि त्याला एका हाताच्या पंज्यावर उभं करीत तोल सावरायला शिकवून सांगून टाकावं—

एक पाय नाचूं दे गोविंदा
तुझ्या घागरीच्या छंदा

एक पाय नाचूं दे मुरारी
तुझी वाजूं दे घागरी

त्याच्या पायातले खुळखुळते पैंजण आपणच धरून घुंगरू वाजवेत न् मनीची पोटभर हौस भागवावी अशातली गंमत होते. म्हणताना सारं कामधाम सोडून या बाळाच्याच तैनातीत रहावंसं वाटतं. त्यातच मग जीव रमतो...

अशा वेळी घरातल्या गावभर तरंगत्या पोरीनं जर मध्येच येऊन—

आटुकल्या मटुकल्या
चवल्या चुटुकल्या

चुटुकल्या झाल्या गोड गोड
जिभेला आला फोड फोड...

असली तालासुरातली बडबड केली की, आणखीनच लहान वयाचं लेणं ल्यायचा मोह होतो. कारण ही मैना नुसती बडबडूनच गप्प बसत नाही तर तिच्या वयाच्या पोरीचे हाती धरून तिला खेळायला उठवावी तशी या बाळाला उचलून उभी करते न् म्हणते कशी—

सालम सालकी
तुझी माझी पालखी

पालखीत बसू
खोबरं खिसू

त्यामुळं मग ते बाळराज आणखीनच खुलालतं. कमरेवर बसून आपल्याला घुसळून सोडतं. खेळखेळ खेळू या म्हणतं. ऐकलं नाही तर चावायला बघतं. तेही साधलं नाही तर पोटावर ढुश्शा मारीत आपले केस उपटतं. म्हणताना मग साहजिकच त्याच्यावर झेपावून त्याला जवळ घेत आपल्यालाही वाचा फुटते——

चल ग राधे बनात ग
चाफ्याचं फूल माझ्या कानात ग

आणि हे तान्हुलं कडेवर घेऊन त्या पोरीसंगं फुगडी–झिम्मा खेळायला हात पुढं होतात. आंब्याच्या झाडाला मोहोर फुलावा त्या रीतीनं खनोखनी गुंजेगत उरीपोटी मोहरून उठतेल्या भावभावनेला मग अवचित बोलावंसं वाटतं–

फुगडी खेळू यंकुटा
भाऊ माझा धाकुटा

सोन्याचा करगुटा
मोती किती लावू ?

मामाची लेक आली
नाव काय ठेवू ?

खंडीभर दाण्याचं
वाण काय देऊ ?

टीचभर खणाची
चोळी काय शिवू ?

आणि मग घरादारात जो हशा पिकतो की, बोलायची सोय नाही. एखाद्या पाणंदीच्या पाऊलवाटेनं चालताना भरजरी शालूचा पदर तिथल्या दवानं भिजावा त्या रीतीनं जीव सुखावतो. एवढ्या एवढ्याशा चिमुरड्या बाळाला मामाची लेक करायची ही कल्पना मनाला हळूच स्पर्श करून जाते व नुकत्याच जन्माला आलेली त्याची छबी नजरेत भरल्यानं आनंदीआनंद जिकडं तिकडं पसरून जातो... म्हणताना मोत्यांनी गुंफलेला चेंडू झुगारीत आभाळातील मण्यांची माळ गुंफतेल्या कृष्णदेवागत उगीचच ऐटी मिरवावीशी वाटते... कौस्तुभाच्या तेजानं झळाळणाऱ्या बाळाएकीचं वात्सल्य मनाला शिणगारून सोडतं...

त्यामुळं मग बाळाला पुढं बसवून त्याच्याभोवती दोनचार मुलं बसवीत एकमेकांचे कान धरून मागंपुढं डुलायला लावीत गंमत करावीशी वाटते. अशा वेळी सगळं अंग घुसळून उठावं अशा परीनं हसतेलं डुलतेलं बाळराज—

आपडी थापडी
गुळाची पापडी

धम्मक लाडू
तेल पाडू

तेलंगीचं एकच पान
धर ग पोरी हाच कान...

या गीताच्या तालासुरात असं खिदळतं, असं नाचतं की, त्याला कुणाची दृष्ट लागू नये म्हणून आपसूकच त्याला उचलून घेत पोटाशी धरायचा मोह होतो...

इंद्रनीळांचे हंस व कोकीळ, मोत्यापवळ्यांच्या राघू मैना, हिऱ्या-माणकांचे चिऊकाऊ, पाचूचे शुकमोर नि रत्नजडित हत्तीघोडे घेऊन खेळखेळ खेळतेल्या बाळराजाला पोटाशी धरताना आमची ब्रह्मानंदी टाळी अशी लागते की, मग आमचंच तोंड वाजतं—

राघू माझा तान्हा
भिंगाची टोपी आणा

मोतीघोस लावा
सयानू तुम्ही शिवा

दृष्ट होईल याला
पदर कुणी घाला

आणि मग पदराखाली तोंड खुपसलेल्या बाळानं हळूच वर मान काढली की, आमचीच बडबड पुन्हा सुरू होते—

टिकली मिकली केली
येकली शेता गेली

तिकडून आला भाऊ
तुझी टिकली पाहू

पहातोस काय मेल्या
शेत खाल्लं कोल्ह्या

खाल्लं तर खाऊ दे
तुझी टिकली पाहू दे

आणि मग खुदूखुदू हसतेलं सोनं अंगावरून खाली झेपावत धूम पळून जातं. लेकुरवाळ्या मनाची अशा वेळी धांदल उडून जाते न् बाळाच्या घुंगुरल्या पायांचा मागोवा घेत आमची पण पावलं त्याच्या मागून धावू लागतात.

आमचं हे ध्यान घरात कुणी पाहिलंच तर सारं घरदार कवतिकानं हसतं न् म्हणतं कसं—

आंब्याच्या भाजीला हाटावं किती
बाळाच्या मावशीनं नटावं किती

तर बाई ते ऐकून उगीचच लाजायला होतं. पदराचं टोक दातात धरत आलेलं हसू दाबायची लहर येते.

तेवढयात धाप्किनी आमचं बाळराज कुठंतरी आपटल्याचा आवाज आल्यानं तो कानोसा घेत आमच्या तोंडून जातं—

घुम रे घुम
तिकडंच घुम
कवळी काकडी
धडाम् घुम

आणि वाघाची झेप घेत पुढं होऊन बाळानं रडू नये म्हणून त्याला उचलून घेत तोंडाला येतील त्या गमतीजमती त्याला ऐकवाव्याशा वाटतात. इत्ता मित्ता गोमित्ता सांगता सांगता ध्यानीमनी नसतानाही आमची जीभ वळवळते—

राजा राणीनो या
टिकली मारून जा
हाळू नको डोळू नको
बाळ रागावलं
बोलू नको...

त्यासरशी रडतेलं बाळराज हुंदके देत देत थांबतं. कुतूहलानं तोंडाकडं बघतं न् मग त्याला हसवायचा प्रयत्न करण्यासाठी घरातल्या सगळ्या पोरासोरांचा मेळा गोळा होतो... मग कुणीतरी मोठे मोठे डोळे करीत न् हातवारे उडवीत बाळाला ऐकवतं, 'एक होती चिऊ न् एक होता काऊ.' त्यासरशी बाळ एकदम उसळी घेत हसतं न् मग झालं गेलं गंगेला मिळतं ! गोष्ट सांगतेल्या मुलावर झेपावतं. बाळाची कळी खुलते. म्हणताना आमचं मन गुणगुणतं—

आणा आणा बांदा बांदा
गिरगिर गिरगिर चांदा
वाटी वाटीभर गंधा
शिपीशिपीभर अक्षता
तान्ह्या तान्ह्या बाळाच्या
नाजूक साजूक तिटीच्या...

बाळाचं श्रीमुख न् हातापाय धुऊन त्याला लख्ख करावंसं वाटतं. काजळतिटी करायचा मोह होतो. अंगडंटोपडं बदलावं म्हणून बाळाला घ्यायला हात पुढं होतात.

पण बाळ कुठं ऐकायला बसलंय ? त्याला खेळायचं असतं. मुलांशी दंगामस्ती करायची असते. म्हणून मग त्याला जवळ घेऊन त्याच्या हाताचं एकेक बोट उंचावीत त्याला ऐकवलं जातं—

काळी मुंगी व्याली बाई
हिचं दूध किती
पैला पेला भरला बाई
दुसरा पेला हाती

काळी मुंगी व्याली बाई
हिचं दूध किती
दुसरा प्याला भरला बाई
तिसरा प्याला हाती...

तशी बाळ आणखीनच सुखावतं, खुलालतं, हातपाय नाचवतं. तोंडातून मजेशीर आवाज काढतं काहीबाही बोब्रडं बोलतं. तर मोठी मजा येते. म्हणून एखादं पोर त्याला हाकारा घालीत सांगतं—

बाळ बंगडं
हिरवं अंगडं
आंबेवनात जातं
आंबे तोडून खातं
पळू पळू घरला येतं...

त्या कारणानं वारंवार ऐकलेल्या ह्या भाषेनं बाळाला आणखीनच फावतं. दोन्ही हातांनी टाळ्या पिटीत पुन्हा पुन्हा हे गीत गा म्हणतं. आंबा खायची त्याला लहर येते. हळूच मग बाळाची आवडती बर्फी आणून कुणी तरी त्याला भरवतं.

एवढ्यात आम्हाला पण बाळाला चिडवायची लहर येते.

लव लव साळाई मामा येतो
खोबऱ्याची वाटी देऊन जातो
गुळाची पोळी खाऊन जातो
दळाचे गोळे घेऊन येतो

त्या कारणानं यातलं कोणतं एक ठाऊक असलेलं बाळराज कावरंबावरं होतं. भिरीभिरी जिकडं तिकडं नजर टाकतं न् मग आपल्याला तो खाऊ मिळाला नाही म्हणून असं भोकाड पसरतं की, एखाद्याला वाटावं ह्याला बडवलंय कुणीतरी !... म्हणताना घरादारातून वडीलधाऱ्यांचा आवाज घुमतो, "कुणी काय केलं बाळाला ?...कोण आहे तिकडं ? आणा बघू त्याला इकडं ? उगाच पोरं कळ काढतात...ये रे राजाऽऽ"...आणि सांगायचं म्हणजे मग त्या आवाजाच्या रोखानं बाळही झम्माट्यानं पळत सुटतं...कुणाच्या तरी कडेवर जाऊन बसतं न् मग वडीलधाऱ्यांच्या संगतीनं चांदोबाची आठवण करीत आभाळाकडं बघून बाळाला अस्मान ठेंगणं करायची लहर येते...वडीलधाऱ्यांच्या गुणगुणण्यासरशी मग बाळाचेही ओठ हलू लागतात...

चांदोबा चांदोबा भागलास का ?
लिंबोणीच्या झाडाखाली लपलास का
लिंबोणीचं झाड करवंदी
मामाचा वाडा चिरेबंदी
मामाच्या वाड्यात येऊन जाऊ
तूप रोटी खाऊन जाऊ
घाल ग मामे तुपाची धार
तुपाची धार गेली वाऱ्यावनं
भाऊजी आले काळे कुत्र्यावनं
का वो भाऊजी रूसला
काळा विंचू डसला

काळा विंचू पापी
रांजणाच्या काठी
रांजण गेला गडगडी
पाऊस आला खडखडी

मग बाळाची विचारपूस निघते.

" माज्या बाळाला काय पाईजे ?...खाऊ पाईजे ? " तशी बाळ खूप खूप हसतं. पाहिजे असेल ते मागतं. बोलणं होईल तसं बोलतं देखील ! त्या कारणानं कुणीतरी त्याला विचारतं, " तू कुणाचा राजा ? " आणि प्रत्येका-कडं बघत बघत, बोटानं खुणवीत ते कुणाचं तरी अमक्या एकाचंच असं न सांगता ज्याला त्याला म्हणतं, " तुज्जा ! "...त्यामुळं मग प्रत्येकजण सुखावतो. बाळाला कुरवाळतो. बाळाचे मुके घेतो. त्याला आंजारतो गोंजारतो...

तर ते बघून त्याच्याभोवती जमलेल्या पोरासोरांना मजा वाटते न् मग ती पोरं बाळाला मध्ये उभं करून भोवती गर्दी करीत त्याला ऐकवतात.

दिन दिन दिवाळी
गाई म्हशी बवाळी
गाया हरनी चिक्कार फळं
गाई म्हशींनी भरलं वाडं
नऊ वाडं जुंपलं गाडं
गाडं जाती वरल्या टेकी
हाकारा घालती गवळ्याच्या लेकी
हाकारा बाई कुणाचा
हाकारा माज्या बाळाचा
अशी डरकाळी कुणाची
अशी डरकाळी वाघाची

असली फडी कुणाची
असली फडी नागाची
असलं शिंग कुणाचं
असलं शिंग बैलाचं
असलं पंख कुणाचं
पंख असलं मोराचं
दूध पाहिजे कुणाचं
पायजेय दूध गाईचं
फुलात फूल कशाचं
ते बाई फूल जाईचं
मावलीत मावली कुणाची
मावली माझ्या बाळाची
बाळात बाळ कुणाचं
आमचं बाळ लाडाचं

आणिक बाई मग अशी हसण्याखिदळण्याची धमाल उडून जाते की, बोलता सोय नाही. सारं घर मग अशा दणक्यानं एवढं घुमारतं की, रस्त्यावरून जाणायेणारानं आत डोकावीत बाळाचं कवतीक नाही मांडलं तर कशाला पाहिजे ... खरं ना ?



## १



# कुळाचार

आपल्या घरच्या बाळराजाचं, राजविलासी केवड्याचं, बाप्पाजी दयाळाचं, वाहत्या गंगेचं, माय माहेरचं, चाफ्या चंदनाचं, घरदाराचं, गाईवासराचं, शेतवाडीचं आणि इंद्रसभेच्या पद्मिनीचं सुख गाताना आमच्या सख्या साजणीचा जीव एवढा होतो. त्यांच्या एकीची आपल्या जवळची अप्रूबाई ती त्यांच्यावर शिंपीत रहाते. गात्या गळ्यानं आणि उसळत्या उमाळ्यानं ती बोलायला लागली म्हणजे भर दिवसाचा सूर्यदेव न् मध्यान रात्रीचा चंद्र देखील डोलायला लागतो. विश्वचक्राच्या रुबाबानं फिरणाऱ्या जात्याला ईश्वर मानून त्याला मोत्यांचा घास घालीत ती दळायला लागली म्हणजे घरात अमृताच्या धारांचा वर्षाव होतो. अशा वेळी हातांचे टाळ होतात, देहाचा मृदंग होतो आणि भावभावनांची शहनाई वाजू लागून मनीचा मोर नाचू लागतो. देवाची पूजा बांधली जाते. त्या नादात विष्णुपदावरील बेलपत्राप्रमाणे पवित्र असलेली लक्ष्मी, तेरा गंगावनातून रिंगण खेळणारा केशीराजा, सोळा चौक मांडून ओटी भरलेली रखुमाई, तुळशीखाली पोथी वाचतेला राम, आपल्या हाती गदाचक्र घेऊन प्रकाशतेल्या पांडुरंगाची जनाई, घागऱ्या व चाळ ल्यालेला गणराज, दाटल्या फुलांच्या चौरंगावरील सीता, मोत्यांच्या चुंबळीत स्नान करणारा शंकर, गोकुळी सुख नांदवतेले श्रीकृष्ण, काशी-

खंडाचा महादेव अशा कुणाकुणाची वर्णी लागते ! भावगीताला उधाण येतं. हरिनामाचा गजर होतो. कल्लोळती भावना मोहरून उठते. आणि मग —

देवाच्या देऊळात दिवा जळतो लोणीयाचा
आत संदूक सोनीयाचा

देवाच्या देऊळात झालं फुलांचं सारवण
रोज हरीचं कीर्तन

या गोष्टीचा पडताळा येतो. देवाच्या गाभाऱ्यात जाऊन मनाला शांती मिळावी म्हणून खटपट सुरू होते. माळी दादानं देवाच्या राऊळाला घातलेल्या सुवासिक फुलांच्या कवलातील सुमधुर दरवळ सुटते. धुपारतीनं माखलेल्या त्या डेऱ्यात जिवाला हुषारी येते. तुळशी मंजिरीच्या माळेनं देवाचा गळा सजवताना चंदनाच्या उटीगत काया सांजिवंत होऊन जाते. सर्वांगावर समाधानाचे रोमांच फुलतात.

दारी तुळशीचं जाळं
दारी चांदीचं घंगाळ
तोच देवाचा वाडा
अल्याड केळीचं बन
पल्याड तुळशी वृंदावन
तोच देवाचा वाडा
मांडव सोन्याचा घातीला
चांदवा मोत्यांचा लावीला
हिऱ्या रत्नांचा जडावा
वाडा देवाचा जपावा

या खुणेनं महापूजेची सांगता व्हावी असा मोह मनाला होतो.

त्यामुळं भल्या पहाटेच्या गार वाऱ्याची मंद झुळूक अंगावर घेत उगव-

तीच्या तेजानं नजर सुखावते. गुलालाच्या गोण्या उधळीत दारी येणाऱ्या आणि मोत्यांच्या सडका फेकीत आपला शोध घेणाऱ्या सूर्याची कन्या राधिका होत वाजंत्री तुऱ्यांनी येऊन दर्शन देतेल्या कुलदैवतापुढं आपो-आप नतमस्तक व्हावंसं वाटतं आणि——

आठ दिसाच्या ऐतवारी नाही नारीनं सारविलं
देवा त्या ज्योतिबानं घोडं माघारी फिरवलं

देवा ज्योतिबाच्या वाटं सारी गुलाबाची पेव
बाळीला किती सांगू भक्ता उधळीत जावं

देवा ज्योतिबाच्या वाटं सारा डोंगर गुजारला
चांगभलं ग म्हणताना गड पन्हाळा हादरला

यातलं कोणतं एक सुख भोगायचा मोह होतो. देवाच्या दारी दणाणत्या सनई-चौघड्याचा नाहीतर शिंगाचा आवाज कानात साठवीत न् त्याच्या कीर्तीची ध्वजा हाती घेत मानकऱ्यांची काठी सजवावयाची लहर येते. धवळल्या चांदण्यात लांबची शेते गाठून बांधावर येतेल्या लक्ष्मी आईला "सोन्याच्या पावलांनी ये" म्हणावं आणि हळद कुंकवाची सडारांगोळी तिच्यासाठी घालीत तिला आपल्या भावाचा न् घरधन्याचा धरला पालव सोडू नको म्हणावं असं मनात येतं. टचाचून भरलेल्या कणसांच्या सुगीत हौस-मौज भराला येते.

दारी चौघडा झडावा, फुलांच्या पायघड्या याव्या, सोप्यात हंड्याझुंबरांचा लखलखाट दिसावा, भर्जरी वस्त्रं नेसावी, जडितांचे अलंकार ल्यावे, अमृ-ताचे कलश सजवावे, राजवर्खी चुडे ल्यावे, पिंजरीचं कुंकू ल्यावं आणि उरी दाटल्या भावनांची शिंपण करीत धरित्रीची पूजा बांधावी म्हणजे अंबारीच्या हत्तीगत झुलतेली सुखासमाधानाची भावना उराशी कवटाळीत आनंदानं हंकारहुंकार घालणं सोपं जाईल यासाठी जीव उतावीळ होतो. दंडभुजांनी रेटीत धान्याच्या भरल्या गाड्या घरी वळवाव्यात तशा रीतीनं

वाडवडिलांच्या चालीरीतींचा सराव करावा म्हणून जीव धडपडतो. सोन्याचा लंगोटा घालून द्रोणागिरी तोलीतच जन्माला आलेल्या अंजनीच्या बाळानं सूर्यावर झेप घ्यावी तसं काहीतरी व्हायला लागतं. म्हणून जनलोकांच्या धन्याकडं धाव घ्यावीशी वाटते. दीपोत्सव साजरा करून हर्षाचे गुढे उभारीत मोत्यांच्या झालरी ल्यालेल्या पालखीतून गोकुळाच्या जन्मोत्सवाला जायची इच्छा होते.

कमरी करदोडा ल्यालेल्या, दंडी बाजूबंद घातलेल्या, हाती मुद्रिका न् कडीतोडे वापरतेल्या, भाळी रत्नजडित पिंपळपान लटकतेल्या, गळ्यात नवलाखी हार रुळतेल्या, अंगावर मोतीहार ल्यालेल्या, पोलारवाळ्याच्या आणि शिरी नाजूक भुरभुरत्या जावळाच्या त्या बाल परब्रह्माचं दर्शन घडावं म्हणजे ध्याई उजळून जाईल याची खात्री वाटते. पण मेलं होतच नाही. चंद्रज्योतींचा देखील उजेड फिका वाटावा या दिमाखानं नेत्रांनी पाहिलेला गौळवाडा जाऊन बघीन म्हटलं तरी आवाक्यात येत नाही. म्हणून हिरमुसल्या मनाला सावरीत कुंभाराच्या विटेनं पृथ्वीखंड सावळ्याचा भार घ्यायचं भाग्य कुठून न् कसं पैदा केलं, त्याचं गणित मांडीत मन गुंगून जातं. भांगतुज्याला लक्ष मोती गुंफतेल्या न् सौभाग्यचुडा ल्यालेल्या रुक्मिणीच्या घरातील विठू दयाळाचे पाय विटेला कसे गवसले याचाच हिशोब मग होत जातो. जेव्हा पहावं तेव्हा झिणझिणत्या टाळांच्या वैष्णवांच्या घरी जाऊन या सगुण गुणाच्या तान्ह्यालाच हा प्रश्न करावा या उत्तरात गवसलेल्या वेड्या मनाला लगाम घालणं भाग पडतं. कारण—

दर्शनाला जाताना दोन पायरी राहिली
देवा माज्या विठ्ठलाच्या चंद्रहाराला दिपली

चंद्रभागेची वाळू नाचनाचूनी झाली माती
देवा त्या विठ्ठलाची दिंडी मासाची आली राती

पांडुरंगाच्या पायरीला नामा बसले बिनघोरी
मनतिरपती झाला हरी

यातलं सौभाग्य तिथं गेल्याशिवाय घरी बसून उपभोगावं कसं हे कळून वळत कसं नाही याच कोड्यात मन घुटमळून फुरंगटतं ! अशा वेळी एक सोडून दोन चिठ्ठ्या पाठवून माहेरपणाला बोलविलेल्या विठ्ठलाच्या सांगाव्याची आठवण येते आणि त्याच्या घरच्या—

विठ्ठलाचं राज रुक्मिन सांगती भैनीला
मोत्या पवळ्यांची रास तिच्या वेनीच्या गोंड्याला

नऊ लाख मोती रुक्मिणीच्या बुगडीला
दामूजी ग सोनारानं समींदर उघडीला

रुसली रुक्मीन जाऊन बसली वाळवंटी
विठ्ठल देव बोलं जनजत्रा दोघांसाठी

शेरभर सोनं रखमाबाईच्या अंगावरी
असा ढाळ देतो चांदसूऱ्या साडीवरी

विठ्ठल देव बोलं का ग रुक्मिणी रागं रागं
सहज पल्ल्याला गेलोवतो आली तुळस मागं मागं

पंढरपूर परगण्यातील ही गंमत साईन संगीत नजरेत येत जाते. मोहरून उठलेल्या कायेला सजवावं म्हणून चंदनाची उटी चढवायला हात शिवशिवतात. त्यामुळं मग डुरड्याला आलेल्या तुळशीबनातील भोरड्या घालविताना वीणा वाजवीत उभ्या असलेल्या विठूदेवाकडे जाऊन मनाची हौस भागवावी या कल्पनेनं बाभळीच्या फुलांचे अलंकार घातलेलं बाळ-पण केव्हाच आठवणीतून झिरपतं...

पंढरीनगरीला जायचं म्हणजे मावशीला चांदीच्या कळशीनं पाणी घालायचं. बाप्पाजी दयाळांचेकडून चंद्रभागेच्या तासात गाडी सोडून गाईला कडबा सोडायचा. जाईजुईच्या थव्यातून राऊळाची वाट तुडवायची. शेंडीचा नारळ फोडून घे म्हणून धाकल्या बंधवाला सांगायचं. आणि मग रथाला वारू जुंपून फिरतेल्या विठ्ठलाच्या घरी जाऊन " आले आले

ज्ञानेश्वर" हा चाललेला जयघोष करतेल्या न् वीणेला वीणा दाटलेल्या दिंडया-पताकांच्या गर्दीत मिसळून राऊळी उडतेल्या झणत्काराची दाद घ्यायची अशातला प्रकार आहे. तर कुणाच्या बापाचं आणायचं हे सुख? विकत घेईन म्हटलं तरी थोडंच मिळणार आहे?...म्हणून गरिबांच्या घरी पंढरी येते चाल्लून आपल्या मनानं!...

गोविंदाच्या मस्करीनं सुखावणाऱ्या दारीच्या तुळशीला पाणी घालताना तिला आपल्या घरी राहायला ऐसपैस जागा देताना, "गेलेवते तुळशी-पाशी, तितं होता ऋषीकेशी आणि माजा नमस्कार पोचूं दे देवा पांडुरंगाशी" असं म्हटलं की, त्यातच सगळं येतं. शिवाय तिला हळद-कुंकू न् पानफूल वाहून तिची पूजा करताना, तिला गंधाक्षता वाहून आरती करताना जर आपण "कुंकूवान, कुंकूपान, कुंकवाचं नेसणं, अर्धांगी बसणं, सून सभावती, लेक कमलावती न् माझा नमस्कार ईश्वर पार्वती" असं म्हटलं तर संताची सावली झालेली ही पतिव्रता इथं सारं विश्वच उभं करते.

जे जे घालू तुळशीवटा
इध्न पळं चारी वाटा
तुळस वंदावी मावली
संताची सावली

जे जे घालू तुळशी आळं
पातकाचं व्हईल काळं
तुळस वंदावी मावली
संताची सावली

जें जे लावू तुळशी कुंकू
पूजा करूनी गेली सखू
तुळस वंदावी मावली
संताची सावली

जे जे लावू तुळशी दिवा
उजेड सगळीकडं देवा
तुळस वंदावी मावली
संताची सावली

जे जे घालू तुळशीफेऱ्या
झाल्या पंढरीच्या वाऱ्या
तुळस वंदावी मावली
संताची सावली

तुळशीला आल्या शेंगा
माळ घालू पांडुरंगा
तुळस वंदावी मावली
संताची सावली

हा चमत्कार आपोआप घडून येतो. अमृताचं आळं शिंपीत जोपा केली गेलेली तुळस सगळा धर्मभाव जमवून आणते. घरकुलात तिच्यामुळं सौभाग्य नांदतं. तिच्याभोवती पूजेसाठी गोळा झालेल्या लेकीबाळींनी झिम्मा घालीत—

यंगी यमुनेचा घाट
शिरी पाणीयाचा माठ
राधे तुझा रंगपाणी
कृष्णा तरी झाला दंग

पायी पैंजण तोडं वाळं
बिरूघाचा संग्राघोळ
राधे तुझा रंगपाणी
कृष्णा तरी झाला दंग

भाळी चंद्र चमक्या भारी
नेत्री अमृताच्या सरी
राधे तुझा रंगपाणी
कृष्णा तरी झाला दंग

हे गीत आळवलं की, गौळणींचा गोकुळातील गौळवाडा चाळून येतो भगवान श्रीकृष्णाची मुरली वाजू लागते ! त्या धांदलीत—

मी तर होईन चांदणी
अतीच उंच गगनी
तिथे तू कैसा येशिल रे
तुझी माजी भेट कैशी रे

मी तर होइन पाखरू
चंद्राला घिरट्या घालिन ग
आणि मग तुजला भेटिन ग...

या रासक्रीडेला आळवीत घरीदारी दिव्य संगीताची कारंजी उसळू लागतात. घरातल्या देव्हाऱ्यातील कृष्णदेव सांजिवंत होऊन उठतो...

आई जगदंबेला साकडं घातलं जातं. घरात गोकूळ नांदू दे, म्हणून तिला नमस्कार करताना एकच प्रार्थना केली जाते, “ आई जगदंबे, मंत्र मला ठाऊक नाहीत. आवाहन किंवा ध्यान कसं करावं मला कळत नाही. स्तुतिपर गोष्टींचं मला ज्ञान नाही. मुद्रांची मला माहिती नाही. फार काय आई जगदंबे, मला धड रडता देखील येत नाही ग ? तरीपण एवढं मला ठाऊक आहे माते की, तुझ्या सेवेमुळं माझं दु:ख लयाला जातं. मनाला उदंड स्फूर्ती येते. तुझा आशीर्वाद माझ्या पाठीशी असू दे ! जगदंब ! जगदंब ! ”

क्षणार्धात त्यासरशी घरचा देव्हारा सजतो. मन तुळजापुरी जाऊन विसावतं. त्यायोगे मग सहजीच घराण्याचे कुळाचार आपोआप पाळले जातात. लोकधर्माची जोपासना होते. भक्तगणांना पाचारण करून घरी

गोंधळ घातला जातो. कुलदैवताला प्रसन्न करून घेण्यासाठी नव्या दांपत्याला पूजेला बसवलं जातं. अशा वेळी मोरेश्वर गणासह सारे देवगण गोंधळासाठी पाचारिले जातात. त्यासाठी मंत्रमुग्ध करून टाकणारी नाचगाणी वाद्यामुरळी करतात आणि सद्भावाची पेरणी करण्यासाठी तिथं बसलेल्या इंद्रसभेत झाडून सगळ्या कुलदैवतांसह नवलाख तारांगण, चंद्र, सूर्य, धरतीमाता आणि उरलेसुरले सगळे सगळे आपलं दर्शन देत घेत मंत्रमुग्ध होऊन गेलेले आढळून येतात. त्यांना बघून नेत्राचं पारणं फिटतं आणि वर उत्साहाचा अमाप उपसा होत राहतो.



# १०

## पाऊस पावणं दारी आलं—

आपल्या स्वखुशीनं पत्करलेल्या निसर्गाच्या कुशीत राहावं, मिळेल त्यात भागवावं, असेल त्यात समाधान पावावं व ठाऊक नाही त्याच्या पंचायती कधी नसाव्यात अशा कुळाचारात आम्ही लहानाचे मोठे झालेलो. आल्यागेल्यांची आपल्यापरीनं ऊठबस करावी हा आमचा स्वभाव बनलेला. शेतीवाडीत राबून पोटापुरतं का होईना पिकवावं यात आम्ही डुंबलेलो. त्यामुळं खेड्यापाड्यातून वस्ती करतेल्या आम्ही परवा आकाशाच्या मंडपात मेघरायांनी डेरे दिले म्हणताना हरखून टुम्म झालो ! चैत्र-वैशाखाच्या उन्हानं करपून गेलेल्या जिवाला हायसं वाटलं. त्यातून आभाळ दणाणून सोडीत चमकतेल्या विजेच्या दर्शनानं आणि गारांचा मारा करीत लहान मुलाच्या अवखळपणाचं रूप लेवून वादळवाऱ्यासकट येतेल्या पावसाच्या सुरवातीच्या शिडकाव्यानं मनाला एकदम संतोषी आली तर त्यावेळी पाऊस पडत्या जमिनीचा असा सुगंध आला की, त्यापुढं राया इंद्राच्या घरचं सुखदेखील फिक्कं पडावं !...

एकदमच एवढी हुषारी आली की, कोसळत्या पावसाच्या अंगणात जाऊन स्वतःला चिंब भिजू दिलं आणि गात्या गळ्याला मोकळा केला—

पड पड पावसा
माजा पिकूंदे ऊसमळा
बाजूबंद मी लीन येळा

पड पड पावसा
हुंदे जमीन भरदार
माज्या कुनब्याची वटी भर

पड पड पावसा
जसा मोत्यांचा शिरवा
मळा सख्याचा हिरवा

पड पड पावसा
माजा पिकूंदे मूगराळा
बंधु घरात लेकुरवाळा

पड पड पावसा
असा कोकण धरतीला
पाणी खडूळ येऊंदे
क्रिष्णाबाई गरतीला

तेवढ्यात पावसानं लईच मनावर घेतलं न् धरणीला असं बेदम झोडपलं की, अंगणात पाण्याचे सागर उभे राहिले ! सडकेनं नद्या वाहू लागल्या. घरावरची कौलं हाडबडली. पत्रे झंकारले. पाऊस पावण्यांनी नंगानाच मांडला जसा न् तापून तापून कोमेजून गेलेल्या घरातही गारीगार झालं. म्हणताना माळीत दळण दळतेल्या काक्या-मावश्यांनी गीतं काढली—

वळवाचा पाऊस ग
फळी धरूनी उठयीला
ताईता बंधु राजा
बाळ कुणब्याचा नटयीला

वळवाच्या पावसाचं
पाणी अंगणी साठलं
कुरी धराया उठलं ग
बाळ कुणब्याचं नटलं

वळवाच्या पावसाचं
सये झाल्याती आगार
बंधूच्या ग शेतामंदी
सोडी पाण्याचं सागर

सगळ्यांचाच जीव सुखावून गेला. मुसळधारीनं पडतेल्या पावसानं दम टाकला तरी वळचणीच्या पन्हाळी टिपकत राहिल्या. पोरीबाळींनी अंगणात काळ्यामाळ्या घालीत अंगावर झिरमिरता पाऊस झेलला. कागदाच्या नावा सोडीत अंगणाला शोभा आणली. ते बघून केव्हातरी कुठंतरी ऐकलेला आवाज कानात घुमला—

देवा मेघरायानं सूर्यासमूर डेरं दिलं
पाऊस पावणं दारी आलं

मेघरायाचं लगीन ढगांचा वाजे डफ
आली नवरी झपझप

मेघरायाचं लगीन ढगायांच्या मांडवात
ईज नवरी लखलखत

त्यासरशी गोफण खेळवत्या हातानं उंच उंच भरारी घेत डामडौल उभा केला व ठिपकत्या पागोळ्यांच्या तालावर आमचा मनमोर डुलावा म्हणाला—

पाणी जाऊं द्या जाऊं द्या
पलाणी पाटाव...

तशी घरातल्या पोरांबाळांनी हातांचे टाळ वाजवीत न् माझ्या सुरात सूर मिसळीत हे गीत लांबवलं——

तिथं लिंबाचा लिंबाचा
आहे साटाव
कोथमीर म्हणीती म्हणीती
माजा सुवास देखो वो...
पाणी जाऊं द्या जाऊं द्या
पलाणी पाटाव...

आणि पैशाला पेंडी विकतेल्या मेथीची, उघडून बघू नका म्हणतेल्या कारल्याची, रुबाब दावत्या वांग्याची, सभेला मांडू नका म्हणतेल्या कांद्याची आणि ऐटीनं आपला वास घमघमवतेल्या लसणाची विचारपूस मग या गीत गातेल्यांनी अशा डामडौलानं केली की, घटकाभर पाऊस पावणे देखील ऐकत उभे राहिले तर !... सरीवर सरी अवचितच पुन्हा अशा नखऱ्यात आल्या की, अमृताच्याच धारांचा वर्षाव व्हावा...

त्यामुळं पाऊसपाण्याची नवलाई आमच्या ओठांवर खेळावं म्हटली आणि उरीपोटी दाटलेला आनंद कंठात खुलला म्हणावा——

पाऊस पडला पडला
वल्या झाल्यात जमिनी
शेती जाती कामिनी पेरणीला

पाऊस पडला पडला
पागोळ्या पाणी गळे
माणिक दारी खेळे लाडूबाई

पाऊस पडला पडला
गरजूनी पाणी पडे
आकाश जणू रडे रात्रंदिवस

पाऊस पडला पडला
विजांचा चमचमाट
धरणीनं हिरवा थाट   पांघरला

झाडे झडाडती
विजा कडाडती
धरणीमाये तुझा पती   येत आहे

पावसाच्या भारे
जणु डोंगर वाकले
हिरव्या रूमाली झाकले   त्यांनी तोंड

पाऊस पडतो थुईथुई
भिजल्या जाईजुई
अंगणात उभी सई   चंद्रावळ

पावसाकारणानं उभ्या राहिलेल्या समाधानाला पारावार उरला नाही. अस्मान ठेंगणं होत खाली आलं. गावोगाव पावसानं धमाल उडवून दिली. नदीनाले भरून चालल्याच्या वार्ता येऊ लागल्या. श्रावणमास जवळ आल्यानं लेकीबाळी माहेरी यायच्या कशा याची चिंता पडली. जिकडून तिकडून सांगावे येत चालले—

भरली कृष्णा कोयना
कोयना हाथोडी खडाफोडी
बंधू दंडानं पाणी तोडी

भरली किष्णा कोयना
किष्णा आली बाई देशी
कोयना आलीया कोकनाशी

भरली किष्णा कोयना
दोघींच्या झाल्या भेटी
सैंदापुराच्या पैलतटी

भरली किष्णा कोयना
पाणी चढलं गुमानीत
बुडली शिकरं तासात...

माणसं हवालदिल झाली. पावसानं एवढं आकांडतांडव करायचं नाही अशी भाषा निघाली. देवदेव करणारांना देवळात कसं जायचं याचं कोडं पडलं. आषाढी वारीसाठी पंढरीला जाणारांच्या मुखी एकच घोष चालला—

भरली चंद्रभागा नावा लागल्या बुडायला
न्हाई रूक्मीन आली पुढं नारळ सोडायला

भरली चंद्रभागा लाटा मारती गुलालाच्या
निऱ्या आवरी पैठणीच्या रुक्माबाई

भरली चंद्रभागा पाना फुलांची केली नाव
आवल्या हाणीत बसला सावळा किष्णदेव

भरली चंद्रभागा यात्रा जमली नऊ लाख
सावळा पांडुरंग नव्वद नावात आंबी एक

भरली चंद्रभागा पाणी कंजाळीनं गेलं
आंबी जिवाला न्हाई भेलं त्येनी नावेत तंबू दिलं

ते ऐकून लेकीच्या आईला काळजी पडली. पंचीम खेळायला पोरी येणार कशा ? नदीची खणा-नारळांनी ओटी भरत तिनं हात जोडले, " पाऊस पावणं जरा सबुरीनं घ्या !..." आणि तिकडे लेकीबाळी मुराळ्यांची वाट बघत उभ्या राहिल्या. शंभरवेळा आतून बाहेर येणंजाणं झालं... पाल कुचकुचली की, त्या " किष्ण किष्ण " करीत घोकू लागल्या—

पाऊस पडतो भरले नदीनाले
भाईराज अडकले पैलतीरा

पाऊस पडतो नद्यांना आले पाणी
देवा सुखरूप आणी भाईराज

तेवढयात कुणीतरी बातमी आणली की, पावसानं दम टाकलाय आणि नदीनाले ओसरू लागलेत. मग काय हिच्या जिवाला उभारी आली. आनंद उसळून वर आला आणि ही मैना सैपाकघराच्या सान्यातून डोकावत गुणगुणली—

पूर ओसरले नदीनाले शांत झाले
अजून का न आले भाईराज

आणि अंगणात खेळत्या पोरींनी पण झिम्मा खेळत गीत काढलं—

आखाडमासी एकादसी
नागार पंचमी कोण्या दिवशी
साजणी बाई ग...

त्यासरशी हिचा जीव वाराहुरा झाला न् ही अवचित मनानं माहेरी जाऊन पोचली पण! रुणझुणत्या पाखराला सांगावा देणं नाही का वाटेच्या वाटसरूबरोबर कमानी दरवाज्याच्या घराची खूण देऊन निरोप धाडणंही नाही. आभाळात जमलेल्या ढगांच्या गर्दीत मोरानं आनंदून नाचावं तशी हिची गत झाली न् सासर घर विसरून हिनं "हस्त हा दिनीयाचा राजा" सांगतेलं हादग्याचं गीत भुलून जात न् स्वतःलाच पाठीमागून म्हणायला बजावीत तोंडानं काढीत सरळ हातानं पेरून टाकलं... त्या नादात ती आणखीन गुणगुणली—

वाजे चौघडा रुणझुण
आला ग हादगा पावणा
दारी तुळस दवणा

लवंगा सुपाऱ्या वेलदोडे
करून ठेवले विडे
आणखीन दुधातले दूधपेढे
वाहते मी हादग्यापुढे
हादगा देव मी पूजीते

जाईजुई शेवंती दुपारी
फुले ग नानापरी
हार गुंफीते कुसरी
वहाते मी हादग्यापरी
हादगा देव मी पूजीते

सखयांना बोलाविते
हादगा देव मी पूजीते...



# ११



## फुलवरा : धुरपाय शिणगार

रानामागली तुळस
पाना फुलांनी फुलली
पुतळ्यांच्या भारूभार
गवर कशी ग लवली...

दारात पाऊस सुप्पानं ओतत होता तरी त्या दिवशी झुंजुरकाचाच धुरपायचा गळा सजला म्हणताना आम्ही खडबडून जागे होत उठून बसलो. तशी घरात येत ती आणखी गुणगुणली—

कराड कोलापूरच्या गौराय
निगाल्या म्हायारी
त्येंच्या ग पैंजनाचा नाद
येतूया दुयेरी...

म्हणताना अंथरुणातून उठून सोप्यात येत आम्ही तिला हाक घातली, “ कधी ग आलीस तू धुरपाय ? ” तशी ती खुदकिनी हसली. “ आलो रातीच ” म्हणाली न् तिनं विचारलं, “फुलवरा सजीवला काय ? ” त्या-सरशी आम्ही नकारघंटा वाजवीत तिला म्हटलं, “ अजून लई अवकाश ! गौरी उद्या येणार आहेत.”

"गौराई याच्या तवा येऊंद्यात्या. तुमी तयारी नगो करायला ?"

"काय काय करायचं ग ?"
"नव्या चिरड्या काडल्या टरंकातनं वर ?"
"न्हाई बाई ! का ग ?"
"गौरायचं डाग केलं काय ?"
"गेल्या सालचं असतील की ?"
"आईला विचार."

आम्हाला काईच ठाऊकच नव्हतं तर यापलीकडं आम्ही काय सांगणार ? दरवर्षी गौराय यायच्या पण न्हवणं नेण्याआणण्यापलीकडं आम्ही कशाचे मालक होतो ?... आणिक हे ठाऊक असूनही धूरपायनं का विचारावं आम्हाला ?

आम्ही जरा हाडबडून गेलो. म्हणताना डोईवरचा पदर काढून पिळीत तो झटकावून पुन्हा डोईवर घेत न् संगं आणलेली हाराळी आम्हाला नीट निवडून ध्या म्हणीत धुरपाय माळीत गेली. भिजून चिंब चिंब झालीवती तर लुगडं बदलावं म्हणाली. म्हणून आम्ही तिच्या पाठोपाठ आत जात काही विचारणार तर तिचाच आवाज आला—

नदीच्या पल्याड म्हादेव ग बाई
पाणी झुळूझुळू जाई
वाण्याच्या पोरी तुमी ठिणग्या ग
जशी फुलली जाई

नेसली पैठण साडी ग
पदर वाऱ्यानं जाई
हातात रुमाल नक्षीचा
राम उडवीत येई

त्या कारणानं आम्ही थबकलो. आणिक मग काय झालं अवचितच हरी

जाणे. गौरी गणपतीचे दिवस तर रोज संध्याकाळी हातपाय दुखोस्तवर खेळतेल्या आमचा पण गळा सजला–

घागर घुमूं दे घमूं दे
रामा पवा वाजूं दे

आला शंकूर बा शंकूर बा
गवर माजी लवूं दे

मोरपंखी चोळीला चोळीला
गवर माझी लेवूं दे

हिरव्या रानात रानात
गवर माजी नाचूं दे...

"अग सोयानू, शाण्या की ग हाईसा ?" धुरपायनं झटक्यासरशी मागं फिरून मटाटा आमचे मुके घेतले न् आम्हाला कुशीत ओढीत म्हणाली कशी, "आता एकेकीचा फुलवरा बगा कशी झोकात सजीवते."

तेवढ्यात आडाचं पाणी आणायला गेलेली आमची आई घरात आल्या-कारणानं त्या दोघीजणी एकमेकींना कुशीत घेऊन भेटत चुलीपुढं गेल्या. एकमेकींत कुचूकुचू बोलत सुटल्या... म्हणताना आम्ही पण राखुंडी हातात घेऊन तोंड धुवायला जोत्यापाशी गेलो.

तसं पाहिलं तर ही धुरपाय आमची चुलत चुलत आत्या. नाचार कोचार संसारातली. पण तिला कशा एकाची हौस भारी. शून्यातून जग उभं करायची जिद्द. त्यामुळं सतरा ठिकाणी गाठी मारून अंग झाकतेलं अंगावरचं भिजकं लुगडं बदलून ती माळीतून बाहेर आली तर एकदम टवटवीत दिसली. आमच्या आईचं जुनंपानंच नेसलीवती. पण तिच्या अंगावर ते नेसूचं लई खुलून दिसलंवतं. अगोदरच गोऱ्यापान असलेल्या धुरपायला या देखणेपणात बघून एकदम बरं वाटलं. तशी मी तिला विचारलं, "चांगलं लुगडं रोज नेसत जा. छान दिसतेस. आरशात बघितलंयस

का तू स्वत:ला ? " म्हणताना दाताखाली पदर धरीत ती गुणगुणली,

पाऊस पडला चिखल झाला
व्हात आली गंगा

गौराय पावनीला जेवायला
भाजी-भाकरी सांगा...

आणिक तिनं आम्हाला बजावलं, " असं बोळ्नी. दोन रातीपुरती गौराय पावनी येनार. तिच्या म्होरं घरातलं असलं बोळ्नी. पाची परकारची भाजी तिला जेवाय करू या न् शेवाया बोटव्यांची खीर शंकर जावायाला शिजवूया म्हनं ! चला. आणा जावा तेरडा भारूभार. फुलवरा नटीवते झोकात. सगळं रंग गोळा करा हं ! " त्यासरशी आम्ही अंगणात पळालो. परसदारीची फुलं गोळा केली. रंगीबेरंगी तेरडा मुठी मुठी आणला. झालाच तर आघाडा दुर्वांपण दुहीदुही हातांनी रग्गड आणला. चाफ्याची फुलं पानं जमवली. कण्हेरीच्या फुलांचे झुबके मिळवले.

हे सगळं बघून धुरपायाचा चेहरा खुलला. तांब्या-पितळेचे तांबे लखलखीत घासून घेत ती सुईदोरा घेऊन फुलवरा सजवायला बसली. एखाद्या सराईत कारागिरागत तिचा हात चालला. भरारा तिनं या पानाफुलांचा फुलवरा बांधला. फुलाचे झुबके जागोजाग गुंफले. पानाफुलांचा शिणगार लेतेला तांब्या हारखून गेला. तशी धुरपाय राजीखुशीनं गुणगुणली—

गुंज गुंज डोळे
सबंमंदी खेळे
सबंच्या नारीनं
शिवाशीव केली
नगरीभाईर गेली

नगरच्या नारीनं
पंचारती केली
आरती घाल्ड आरती
पिरती घाल्ड पिरती
किती घाल्ड ग सोनं
आमच्या गौराईला
जोडव्याचं लेणं

आणिक तांब्याच्या वाटीला काजळानं नाकडोळे काढीत गौराईचं बाळ तयार करून न् कुंभाराकडून आणलेल्या मुखवट्यांवर काचेच्या मण्यांचे तिनं गुंफलेले चकाकते डाग घालून तिनं समाधानाचा सुस्कारा सोडला पण तिला आणखीन् काय काय पाहिजे होतं ते गवसेना तशी ती आम्हाला विचारीत फणकारली,

फुलाची गवर माडीला
चांगुणा गेली पाण्याला

गिरजा बसली न्हायाला
मी गेलते इच्चारायला

पायातलं पैजण काय ग केलं
बाई मी दिलं जोग्याला...

म्हणताना आम्ही हसलो. तिच्या हाताखाली हे दे, ते दे, करीत वावरताना म्हटलं कसं, "गवर येऊ दे तरी धुरपाय, का उगं आपलं बोलावंच?" त्यामुळं ती चुपचाप बसली. बाचक्यातली फुलं खालीवर करीत मग तिनं त्यांचे सुंदर घोस बांधले. फुलवराच्या तांब्यांच्या गळ्याला अडकावले. त्यासरशी दांडगी शोभा आली. त्यामुळं आमच्या आईनं खालीवर न्याहाळीत फुलवराला कुरवाळून सांगितलं—

झाड झुपका
फूल टपका
शोभेला ग दोघी
त्यात ठेवली दवत लेखणी
त्या परास मी देखणी...

धुरपायचा चेहरा टवटवला. हारखून टम्म होत तिनं म्हटलं, "वैनी, वैनी, आपुन गवर जांगवायची. गौरीचे कान फुकायचे. तर सारी रात खेळूया. बोलीव कुनाकुनाला.... म्हनावं—

नंदी नंदी ठोकीन तुझी पाठ
धरीन तुझी शिंगं
फुकीन तुजं कान

विठूरुखमिनीची धुरपाय आलीया म्हणून सांग..." आम्ही "हो, हो, पोरी बोलावतो. बायकांला सांगावा देतो." असं चटकिनी उत्तर केल्यावर ती हसली. आईनं पण "बराय, बराय" म्हटल्यावर तिचा चेहरा उमलला. खुशीनं तिची मान हलली, डोलली. फुलवरा आणखीन नटू लागला. हळदकूंकू ल्याला. गंधाक्षतांनी माखला गेला... चंदनाची उटी पण ल्याला. सारं घर त्यासरशी घमघमून गेलं...

फुलवरा न्हवण घेऊन आम्ही नदीवर गवर आणायला गेलो त्या वेळी नव्या चिरड्या नेसलोवतो. धुरपायनं काढलेली पिवळी धम्मक फुलं नाकातल्या मोरणीचा, कानातल्या फुलांचा, गळ्यातल्या बोरमाळेचा नू हातातल्या काकणांचा साज लेवून आलीवती ! त्या झोकात आमचं ध्यान नटलंवतं ! चंदनाची उटी शिंपीनं फिरवीत आमच्या हातावर सजलीवती. आम्ही कुणा थोरामोठ्यांच्या लेकी दिसत होतो.

त्यामुळं आमच्या मुखी रंगलेलं—

ये ग गवरीबाई
एवडं जिवूनी जाई
आता काय करू बाई
माता गऽऽ
दारी शंकर उभा ग
शंकर साळाऽ राजा भोळाऽ
नगरी सोडून जाय गऽऽ

हे गीत ऐकणाराला खुलवीत होतं. संगं आलेल्या धुरपायला सुखवीत होतं. " गवर कशी गजबारानं येऊं दे " म्हणत ती आम्हाला गीतं देत होती. आम्ही ती सांगेल त्या झोकात गीतं गात होतो. त्या कारणानं—-

घेतली ग सुपली
आणली ग कुरकुली
राई गेली खेळायला केळीच्या बनी
तितं गोईंदा खेळतेला
इटीदांडू उडवतेला
राईनं धरला म्हवनी पावा
गेली गवळवाडयाला...

यातली गंमत खुलत होती. नवी गीतं कळत होती. फुलवरा ऐटीत चाललावता. आमच्या हातात झोळणे होते. पायातले पैंजण वाजत होते. नदीतले पाच खडे घेऊन आम्ही आणलेली गवर डामडौलानं मिरवीत घरी येत होती. झिरमिरत्या पावसात आमचं ध्यान खुदखुदत होतं. आंब्याच्या बनात वाडूळ रमलेली गौराय दीडदोन दिवसांच्या बोलीनं माहेरी निघालीवती. तिच्यासंगं आम्ही पण खुशीत घरी निघालो होतो...

" गवराय आली गवराय आली "
" कोणत्या पायानं ? "

" हळदकुंकवाच्या "
" हिऱ्या माणकांच्या... "

त्या कारणानं अंगणात आल्या आल्या हळदकुंकवाचे हाताचे ठसे काढून घातलेल्या पायघडीवरून घरात जाताना गरम पाण्यानं आमचे पाय धुऊन आम्हाला हळदकुंकू लावून, पंचारती ओवाळीत आमची आई बोलत होती न् धुरपाय सांगेल ती उत्तरं आम्ही करीत होतो...

गौरायची पावलं मग सुखसमृद्धीच्या, आरोग्य आबादीच्या, उदंड धनदौलतीच्या, झोकानं आमच्या घरात पडत होती...

रात्र रात्र जागून आईनं न् धुरपायनं तयार केलेल्या लाडू, करंजी, चकल्या, शंकरपाळी, शेव, अनारसी, वड्या न् असलंच काय काय केलेल्या ताटाच्या आराशीमागं नवी जरतरी लुगडी नेसलेल्या दोघीजणी गौराय बसल्यावत्या. जिगाच्या न् मण्यांच्या दागिन्यांनी, फुलामाळांनी, कापसाच्या पोवत्यांनी नटवल्यावत्या. समोर त्यांचं बाळ बसलंवतं. त्याच्यापुढं रांगोळी. मग निवदाचं भाजीभाकरीचं ताट न् आवतीभोवती आम्ही असा सोपा भरवलावा. दोन्ही बाजूंना समई पाजळतेल्या. मधे उदकाडी दरवळतेली. सारं कसं देखणं दिसतेलं. तर ते बघून धुरपायनं गौराय पावण्यांची दृष्ट काढली. आमच्या वरून मीठ-मोहऱ्या उतरल्या न् मग खेळगाण्यांचा भडीमार असा उडवून दिला की, सारी गल्ली गोळा झाली.

दुसऱ्या दिवशी पुरणपोळीचं जेवण करून गौराय विसावल्या तेव्हा कुठं आईच्या न् धुपरायच्या हाताला दम पडला... आणिक मग संध्याकाळी दोघींनी पण परात पालथी घालून, वर वस्त्रगाळ राख पसरून न् त्यावरती एका हातातलं लाटणं न् दुसऱ्या हातातली डाव टोकांनी फिरवीत असं नादमधुर संगीत उभं केलं की, आम्ही त्या वेळी खेळतेल्या गौळणी भुलून गेलो... झालंच तर या संगीताच्या आधारावर त्या वेळी त्यांनी—

गवरी ग बाई जागरानं तुजं
जागता जागता पडल्या झापाडी
एवढ्या निजंची पिरत केवडी
सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी
नारळीच्या गोण्या फेकिल्या अंगणी...

या गीताला आपल्या ओठांवर असं काय नाचू दिलं की, त्या वेळी भरलं अंगण आमच्यासकट मंत्रमुग्ध होऊन गेलं तर... "वा वा! फार छान!" पाऊणशे वयमान उलटून गेलेल्या धुरपायच्या गळ्यानं सगळ्यांचे कान तृप्त झाले...

गौराय पावण्यांच्या कारणानं आमच्या चंद्रमौळी घरात लंकेचं वैभव उभं करतेल्या धुरपायच्या हौसेमौजेनं सगळ्यांचीच तहानभूक हरपून गेली.

घरी येतेल्या पावण्यांची एवढी ऊठबस आमच्या कानावर कधी कुठं आली नव्हती. अंहं! सगळाच साजशिणगार असा झोकात होता, असा झोकात होता की, पाहाणारांची नजरच ठरूच नये!...



# १२



## गावाकडची दिवाळी

मोगरेल तेलानं चोळूनमोळून गोठ्यातल्या दावणीच्या गाईवासरांना सोमूनी पाण्यानं आंघोळ घालतेल्या आमच्या तात्याला बघून सारं गाव हसायचं. कावेनं रंगवलेल्या या गाईवासरांच्या शिंगाला कातरून लावलेल्या बेगडेच्या चांदण्यांची वाहवा व्हायची. चंदनाच्या उटीनं या गाईवासरांचे हातपाय माखलेले पाहिले की तात्याला लोक नावं ठेवायचे. म्हणायचे की, "उग उसाभर किती म्हनावी जनावरांची रामराया ?" तात्या त्याउप्पर हसून बोलायचा, "असूं दे. ह्या गाई आमच्या घरच्या लक्ष्मी हाईत्या. त्येंची व्यवस्थेबार पूजा नगं हुयाला ?" आणि मग देव्हाऱ्यातल्या देवागत धूपदीप करून फुलांच्या गजऱ्यांनी त्यांना नटवीत राहायचा. हळदी-कुंकवाच्या लाकडी करंड्याला पुसून काढीत हळदीकुंकवानं या जनावरांना माखायचा. तशी आम्ही म्हणायचो, "वसुबारसेचं व्रत ह्या तात्यागत न्हाई कुणाला निभायचं ?"... त्याला हे बोलणं मग गोड लागायचं. गाईवासरांच्या पावलांनी मग झोकात आमच्या घरी दिवाळी यायची. सगळीकडं कसा आनंदीआनंद व्हायचा.

आमची गाईवासरं लई धष्टपुष्ट. कासंड्या कासंड्या दूध निघायचं. घरात रोजच्या रोज ताकाचा डेरा घुमायचा. दह्याची लोटकी सरायची. तुपाच्या वाट्या प्रत्येकाला मिळायच्या. म्हणून सारं घरदार वसुबारसेच्या

दिवशी पंचारती घेऊन या गाईवासरांना ओवाळायचं. पुरणावरणाचा निवद दाखवायचं. देवागत नमस्कारही घालायचं !

मग तात्या गोष्ट सांगायचा. म्हणायचा कसा, " एकदा काय झालं की, आटपाट नगरात एक म्हातारी व्हायची. घरात ढोरं अमाप. गाईम्हशी रग्गड. दांडगे बैल दारात हत्तीगत झुलायचे. गव्हाळी मुगाळी वासरं मस्त डरकाळ्या फोडणार. तशी काय झालं की, ही म्हातारी आश्विनमास गाठून द्वादशीला भल्या पाटंचीच शेतात निगाली. काय ? शेतावर निगाली तर तिनं सुनेला कसं म्हटलं, ' अग, अग, इकडं ये ' पोरी, सून ' कायजी आत्ती ? ' करीत पुढं आली. मग ही म्हटली, ' मी शेताव जातीया. दोपारा यीन,तवरमाडीव जाऊन गहू, मूग, दाणे काढ. गव्हाळं मुगाळं शिजवून ठेव. 'ही बराय म्हटली न् म्हातारी शेताव गेली.

सून नव्यानं आल्याली गा ? तिला काय ? सासूनं सांगितलं तसं तिनं केलं. गहू मस्त पायली-पायली काढले व दारात गव्हाळी मुगाळी वासरं हुती ती सप्पय चिरून शिजिवली !...

आगा देवा गा ! सासूनं आल्या आल्या हे बघितलं मातूर न् ती गेली घाबरून ! आता काय करावं ? तिचं काळीज उडून गेलं. देव्हाऱ्यातल्या देवापुढं डोकं आपटीत बोलली, ' देवा, महाराजा, काय बी करून माझी गव्हाळी मुगाळी जित्ती हूंदेत. मी तुला साकार वाटीन न् न्हाईच ऐकलंस तर रगताचं शिपनं करीन तुज्या म्होरं. देह ठेवीन ! ' स्वत्ता तिथं ठाण मांडून बसली. डोळं फाडफाडून देवाच्या पोटात शिरावं म्हटली.

तशी देवानं तिचं ऐकलं. तिची गव्हाळी मुगाळी वासरं त्येनं जित्ती केली. हंबरून हंबरून दे माय धरणीठाय करतेल्या गाई ती बघून गप्प झाल्या. उड्या मारमारीत वासरं त्येंला जाऊन बिलगली. म्हातारीचा आनंद गगनात मावेना. तिनं मग देवाची मनसोक्त पूजा केली. गाई-वासरांला ववाळलं. निवद केला. वाढला. आपल्या हातानं भरीवली वासरं एकेक मुटका देत !..."

ही गोष्ट ऐकून आमची तहानभूक हरपून जायची. गावातल्या घराघरांत

मग ही गोष्ट फिरायची. तशी त्या दिवशी धार निघायची नाही. वासरं पोटभर प्यायची. गाईवासरांच्या लडिवाळ हंबरण्यानं गोठा घुंगुरल्यागत निनादायचा. आम्ही मुलं गाईच्या गळ्याशी पडून त्यांना मनसोक्त हेंदकाळायचे. त्यावेळी गाईवासरांच्या अंगावरल्या लवेगत आमच्या पण अंगावर बारीक काटा राजखुशीनं फुलायचा. तात्याची तर मग अशी कळी फुलायची की, ज्याचं नाव ते. ताज्या वैरणीचा भला दांडगा भारा शेतावनं आणून ह्या गाईवासरांना मूठमूठ देताना त्याला अस्मान ठेंगणंच व्हायचं. मग आमच्या घरात सगळ्यात अगोदर गोडयातेलाच्या पणत्यांची ओळ पहिल्यांदा गोठ्यात चमचमायची।... गाईवासरांच्या दावणीपुढच्या दीपमाळेनं अंगणाला मग अशी शोभा यायची की, सारं गाव हे सोपस्कार बघायला गोळा झालं पाहिजे ! म्हणजे मग तात्या खुशीनं इकडून तिकडं न् तिकडून इकडं फिरावं म्हणायचा. अशा वेळी त्याचं पायतण असं काय झोकात करकरायचं की, आता आपल्याला तात्या खाऊ देऊन गाईच्या पाठीवर बसवीत तिथंच तासन् तास लोळू देणार या कल्पनेनं आमचा जीव एवढा व्हायचा।...

वासरांच्या जोडीनं त्या वेळी आम्ही पोरंपण गाईला प्यालो तर तात्या रागवायचा नाही का 'मागं व्हा गाई लाथ मारील' असा घरातूनही कुणाचा आवाज यायचा नाही ! अशा वेळी गाईचे डोळे आमच्याशी बोलत असे मस्त पाणावयाचे की, त्यापुढं सारं सारं कसं फिक्कं फिक्कं वाटायचं !...

आणि मग त्याच वेळी जर बाहेर अंगणात "दिन दिन दिवाळी, गाई म्हशी वोवाळी" च्या तालासुरात आपली म्हणून वेगळी सुरावट फेकीत...

टिपक्या दांडया नम नम करे ऽऽ
डाव्या हाती रंगन भरे ऽऽ
जेवना हातमां पिप्पयपान
गायी कोन वारे सीताराम

सीतारामाच्या कपिल्या गाई
हिरवा डोंगर चरून जाई
चरता चरता पडा पावा
पवानी बांधी गन झोपडी
गन झोपडी म्हान रावा
रावानी मारी चिरकांडी
तटे मनी गाय एखली
गायले आया हांडया कोंडया
त्याले बांधा लाल गोंडा
लाल गोंडानी सावली
दहीदुधाची मावली
आरे तुना ढोरक्या मोठा
आरे तुना वाडा भरी दाटी
आरे ह्यांना हातमां काठी
आरे लय खोबरानी वाटी

असा काठ्यांचा नाच घालीत गाई वासरांपुढं ही रंगभोगाची पूजा मांडली तर मग माणूस स्वतःलाही विसरून जायचं!... तशी गोकूळचा गौळवाडा आमच्याच घरी येऊन ठेपायचा!...

भल्या पहाटेचं उठावं, गोठ्यात जाऊन ताजं हिरवं शेण गोळा करावं आणि अंगाला झोंबतेल्या थंडीला बाजूला सारीत गौळणी थापीत बसावं असा आमच्या मंजुळा आज्जीचा तगादा. म्हणून डोईला रात्री घातलेलं टोपडं भराभरा बंद सोडून फेकून देत आम्ही पैलं गोठ्यात जायच्या. पाटीभर शेण गोळा करायच्या. अंगण लोटून काढीत तिथं शेणसडा घालायच्या. पैस जागा बघून वावभर जागा सारवून काढायच्या. मुटका मुटका शेणाच्या गौळणी थापायच्या.

इतक्यात आमची मंजुळा आज्जी यायची. मग ती पहिल्या दिवशीच्या

गौळणींसाठी कट्टा थापायला लागली की, गौळणींचे हात न् टोप्या तयार करीत आमचे हात वळवळायचे. मोठी गंमत यायची. मंजुळा आज्जीच्या चौकसपणात आमचं करणं बसलं तर ठीक नाहीतर ऐन दिवाळीत पण कंबरडं ढिलं व्हायचं ! म्हणून ध्यान नीट जाग्यावर ठेवूनच आम्ही हे काम करणार हे ठरलेलं.

त्यामुळं दाराशी उंचउंच गौळणींच्या डोक्यावर बारकं चिपाडाचं काटूक आडवं ठेवून वेस करावी आणि मधोमध शेणाच्या टिकल्या चिकटवीत त्या वेशीचं न् गौळणींचं अंग सजलं की, अगदी पुढच्या अंगाला शिंगाडया असावा हे पण गणित आम्ही बिनचूक करायच्या. झालंच तर फुटक्या बांगडीची अर्धी काच शिंगाडयाच्या तोंडात घुसवून शिंगाची ऐट आणली म्हणून शिंगाडया गौळण नखरेल दिसायची. असं झालं की, जीव भांडयात पडायचा. मंजुळा आज्जीच्या मनाजोगती मग विहीर निघायची. गौळणी एक डोईवर न् एक कमरेवर घागर घेऊन पाण्याला निघायच्या. त्यांच्या पोटात मखमली फुलांचे कमरपट्टे सजायचे. भारी मजा वाटायची.

त्या दिवशी आटपाट नगर मांडताना तर तब्बल दोन तास आम्ही या गौळणींच्या घोळक्यातअडकून पडलो... सैपाक करतेली, दळण दळतेली, बाजार मांडतेली, पोरं खेळवतेली, पाण्याला जातेली, शेताला निघालेली, हिरीबारवेला जातेली, रहाटानं पाणी शेंदतेली, देवाची पूजा करतेली, हळदकुंकू देतेघेतेली अशी सतराशे साठ प्रकारांची गौळण जागच्या जागी बसली न् एका अंगाला बळीराजा मांडून त्याचे हातपाय न् डोकं चेपीत गौळणी उभ्या झाल्या, तेव्हा कुठं श्वास घेता आला नीटपणी !...

बाप रे ! किती दमायला झालं म्हणून सांगू ? शेणाच्या हातानं पुढं येतेल्या झिपऱ्या सावरताना तोंडाला पण शेणाचे डाग पडले न् मग आमचं ध्यान असं रंगलं की बासच !

शेवटच्या दिवशीच्या पांडवांच्या सभेनं तर उभ्या गावात आमचं कवतिक झालं. आमक्या आमक्यांच्या गौळणी बघा जावा म्हणून आवई उठली. पाची पांडव, सहावी द्रौपदी साईन संगीत आम्ही बसवलेली. गौळणी झोकातच

झालेल्या. गळ्यात कापसाचे न् फुलांचे हार. डोईवर चिमणचाऱ्यांचे तुरे. पुढ्यात पाची पक्वान्नाचं भोजन जेवायला. अंगावर फुलांचे शाल्ह शेले. समोर तेवत्या समया न् जळत्या उदबत्त्या ! मग काय विचारता थाट ? आमचे आम्ही पण खूश तर ! मंजुळाआज्जीनं आमचे मुके घेत दृष्ट काढली ! ठाऊक आहे ? चिपाडाच्या काटक्यांनी न् आंब्याच्या डहाळ्यांनी लकाटलेला मांडव तर असा झोकात केलावता की, दिवाळी दिवाळी म्हणजे काय ते आपल्या मनानं कळलंच पाहिजे ! आणि दारातल्या दीपमाळेसकट सगळीकडं पण त्यांनी अशी शोभा आलेली की पाहातच राहावं ! शप्पथ ! कुणालाही विचारा. खोटं ठरलं तर जीव गहाण टाकू ! उगीच नाही !

आणि ह्या गौळणींच्या जोडीला आम्ही घातलेल्या ठिपक्यांच्या रांगोळ्यांनी तर आमचं अंगण असं शोभिवंत व्हायचं की ज्याचं नाव ते ! घनश्यामाच्या भूपाळीत आळविलेली, वारांगसरितेत सांगितलेली न् भारतदेशाचं नाव काढणारी ही रांगोळी आमच्या हाती रुळू शकली हाच आमच्या मंजुळाआज्जीचा आनंद. त्या कारणानं सात ठिपक्यांचं कासव, तेरा ठिपक्यांची कोयरी, नऊ ठिपक्यांचं ज्ञानकमळ, स्वस्तिक, पाळणा, वेलदोड्यांचा वेल, गोपूर, गालिचे आणि काय काय असं नानापरीनं शिरगोळ्याच्या पिठाच्या रेषांनी जुळवलं गेलं न् वर हळदीकुंकवाच्या रेषांनी अगर ठिपक्यांनी सजवलं की, जिवाला कसं एकदम बरं वाटायचं. अशा वेळी मंजुळाआज्जी म्हणायची, “ हे स्वस्तिक मजी सूर्यानारायणा देवाची बैठक, शिवदेवाच्या पायावरची भाग्यरेघ. विष्णुदेवाच्या बेंबीतून निघाल्याली आठ पाकळ्यांची कमळ खूण. उगवतीची वाट दावणारी मंगलपत्रिका ! माणसाचं म्हणं नशीब सांगती ती. देवाधर्माची ही उगं न्हाई खूण ठरली जवातवा काडायला ? ” आणि मग नानापरीची स्वस्तिकं स्वतः अशा झोकात काढायची की, पाहताना आपली नजर ठरू नये का कशातलं काय एकाएकी ध्यानात पण येऊ नये.

पाच ठिपक्यांचं बिल्वदळ काढलं की, महादेवाच्या पूजेचं बेलांचं पान तयार होतं असली भाषा करीत ती आम्हाला रांगोळी शिकवायची न् मग

दिवाळीचं अंगण अशा झोकात दिसायचं की, त्या वाटेनं येत्या जातेल्यांनी घटकाभर थांबलंच पाहिजे.

या रांगोळीच्या नादात सकाळ-संध्याकाळ आम्ही कितीतरी वेळ घुटमळावं न् एकदा सोडून शंभरदा एकेक रांगोळी पुसून ती जुळवीत बसत शिरगोळ्याचं पीठ ढिगानं नासावं असा रोजचा ठरलेला खाक्या आमचा. पण म्हणून कुणी रागवायचं नाही का खेकसायचंही नाही. उलट थोरल्या बायकांच्या हाताखाली फराळाचं करीत कचकून राबताना आमच्याएकी कवतीकच निघायचं न् वर बारक्या पोराला आकाशदिवा करायला मदत करीत जावा असा इशारा व्हायचा. म्हणून रांगोळीच्या नासधुशीनं न् हळदकुंकवाच्या रंगानं आमचे झुबले-परकर असे मळून जायचे की, ते धुताना शाडू-मातीच्या वड्या खंडीनं सरायच्या न् तास न् तास विहिरीत डुंबताना मज्जाच मज्जा यायची...

रात्रीच्या वेळी झोप आली तरी डोळ्याला पाणी लावून ताटकळत दुसऱ्या कुणाच्या घरी नसेल असा चुरमुरी कागदाच्या न् जिगाच्या नक्षीचा आकाशदिवा करीत मध्यानरात्र उजाडली तरी वाहवा नसायची. दारी आकाशदिवा आला की, घरात भाग्यलक्ष्मी येते या कल्पनेनंच जीव खुषीत यायचा. अशा वेळी लाडू करंज्यासाठी ताजी रवापिठी दळलेल्या जात्याबर घरचे शेलके पारवे घुमायचे न् त्यांच्या सादात आमचा साद मिसळीत आम्ही पण ओव्या गायचे....

लक्ष्मीआई आली तू आल्याली जाऊ नको
बाळ राजसाच्या माज्या घरला पालव सोडू नको

लक्ष्मी आई आली आली शेता नि शिवारात
लाडक्या बाळा माज्या पाणी तुज्या घागरीत

लक्ष्मी आई आली आली शेताच्या बांधासडी
सावळा बाळराज हाती गोफण पाया पडी

लक्ष्मी आई आली धरी हाताची करंगळी
पित्या ग दौलताची मी का दावीते सोपामाळी

लक्ष्मी आई आली हाती तांब्या तो अमृताचा
जडाव्या बंधुजीचा वाडा विचारी समृताचा

लक्ष्मी आई आली आली उठत बसत
माझ्या ग हावशाचा वाडा गवळ्याचा पुसत

लक्ष्मी आई आली सारी बैलाच्या ग नकी
लाडका बाळराज धड्यानं सोनं जोकी

आमच्या शेतवाडीला बरकत येऊ दे अशा घोकण्या घालायचे. वडिल-धारी माणसं दंडस्तान घालीत पार देवळात जाऊन देवाच्या पाया पडायची.

तर अशा वेळी आमच्या घरचा आकाशदिवा गावातल्या चावडीवरनं पण दिसावा असा उंच उंच राहायचा. त्याची तेलवात आमचे बाबा घराच्या कौलांवर चढून पाहायचे. त्यांच्यामुखी शिवदेवाच्या, विष्णुदेवाच्या, यमदेवाच्या, घरच्या पितरांच्या आणि नवलाख तारांगणासकट झाडून सगळ्या देवतांच्या एकी उदे बोलणं व्हायचं. आम्ही मुलं त्या वेळी अंगणात उभं राहून –

दिव्या दिव्या दिपत्कार
कानी कुंडल मोतीहार

असली गीतं बडबडत काळ्यामाळ्या घालून खेळायचे व फुलबाजा, चंद्रज्योती न् फटाक्यांची मग धमाल उडून जायची.

आमच्यासारख्या मुलखावेगळ्या झोपाळू मुलींना दिवाळी आली म्हणजे भल्या पहाटेला कोंबडा आरवायच्या आत उठायची शिक्षा भोगताना भारी जड जायचं. पण आमची चंद्रीकाकू सांगायची, ‘ चातुर्मासात निजलेला देव उठलाय. तुमी उठा. आज धनतेरस. पूजा

करा. तेल-उटणं लावून तुमाला आंघूळ घालते न् मग पूजेला पाठविते.' तिचं ऐकावं लागायचं. देवाला जाग आली म्हणून आम्हाला पण यावी यातलं काही कळायचं नाही. पहाटेचं उजाडाव्याच्या आत गरम पाण्यानं चोळूनमोळून तेल-उटण्यासकट वासाच्या साबणानं केलेली आंघोळ घमघमायची. त्या नादात आम्ही फराळाचं पोटभर खाऊन फटाके लावायचे. आमच्या घरी मामा ब्रह्मपूजा करायचे, त्या वेळी केळीच्या पानावर एक मातीचा घडा ठेवून त्याची पूजा व्हायची. निवद दाखवून न बोलता मामा जेवायचे. आम्ही पण त्यांच्या पंक्तीला बसून शहाण्यागत वागायचे. तशी जेवणं उरकल्यावर मामा सांगायचे, "पोरांनू, आज धनतेरस. यमदेवाला संतुष्ट करण्याचा दिवस. दीपदान करावं मजी बेस असतंय. मरायचं वय नसताना माणूस मरत नाही." तशी आम्ही नुसत हूं म्हणावं ! कळायचंच नाही कशातलं काय ते तर ?

आमच्या घरी मोठी माणसं सोनंनाणं, अलंकार हे सारं नीट धुऊन पुसून ठेवायची न् विष्णू, लक्ष्मी, योगिनी, गणपती, कुबेर असल्या देवांची पूजा निघायची. त्या दिवशी उंच उंच दिवे लावीत ही पूजा केली जायची. ते आम्ही बघायचे तेवढे. कारण हे कशाला ते कशालाची पंचाईत कोण करून देणार ? तरीपण या दिवशी अखंड दिवा जळला पाहिजे, जमेल तेवढं दान झालं पाहिजे आणि पुरणावरणाचा निवद केला पाहिजे, या वडिलधाऱ्यांच्या कुळाचाराची गोष्ट लक्षात घेताना गंमत वाटायची. यमदेवाची पूजा केल्यानं याच दिवशी धन्वन्तरीचा उदय झाला या कल्पनेनं शहाणं व्हावंसं वाटायचं.

नरक चतुर्दशीला तर आमच्या घरी धमाल उडून जायची. देशोदेशीच्या असंख्य पोरीबाळींना बंदिवासात ठेवणाऱ्या नरकासुराचा भगवान श्रीकृष्णांनी वध केलेला हा दिवस. म्हणून लक्ष्मीला उजेडात आणण्यासाठी जागोजाग पणत्या लावीत घरातलं किटाळ फेकून द्यायची गर्दी उडून जायची. दारात शेणाच्या थापलेल्या उताण्या नरकासुरावर घरातला केरवारा फेकून दिला जायचा न् मग मंगलस्नान करून लक्ष्मीला,

देवदेवतांना नमस्कार घालता घालता कंबरडं ढिलं व्हायचं. कारण घरात बघावं तिथं देव न् पाहावं तिकडं वडिलधारी माणसं ना ?...या सगळ्यांना नमस्कार झालाच पाहिजे अशी आम्हाला ताकीद असायची !...

आमच्या घरातलं लक्ष्मीपूजन बरीक आम्हाला फार आवडायचं. त्या दिवशी महाकाली, महालक्ष्मी, महासरस्वती यांची पूजा आम्ही पण मोठ्या माणसांबरोबर करायचे. दौत, रुपाया न् वही पुजली जायची. देवादिकांना जिंकून बळी राजानं लक्ष्मीलाही बंदिवास घडविला होता तेव्हा भगवान विष्णूनं वामनाचं रूप घेऊन सर्वांची सुटका केल्याच्या आनंदासाठी हे सारं घडत असल्यानं आम्ही रात्रभर सोंगट्या, पत्ते न् सारीपाट खेळत बसायचे.

लक्ष्मी म्हणजे भगवान् विष्णूची पत्नी. धनसंपत्तीची देवता. सौंदर्याची अधिष्ठात्री. त्यामुळं दिवाळी म्हणजेच तिची पूजा असं आम्हाला शिकवलं जायचं. अमावास्येच्या घनघोर अंधारातही तिनं आमच्या घरी येऊन वास्तव्य करावं यासाठी नव्या वर्षाच्या जमाखर्चाच्या वह्यांवर " श्री " काढायला लावीत आमचं डोकं टेकवलं जायचं. आम्ही सोन्यानाण्यांनी घडविलेल्या धनलक्ष्मीच्या मनोभावे पाया पडायचे. अशा वेळी आमचे आजोबा तोंडानं मोठा आवाज काढीत म्हणायचे—

" म्हणा बाळांनो, हे लक्ष्मी, तू सर्व देवांना वर देणारी आहेस. बिष्णूला प्रिय आहेस. तुला शरण येणाऱ्यांना जी गती प्राप्त होते, ती आम्हाला तुझ्या दर्शनाने होवो. "

आम्ही तसं म्हणून लक्ष्मीपूजन करायचे. पाया पडायचे. हात जोडून दिव्याच्या ज्योतीशी काही बोलत न् एकटक पाहात बसायचे. मनात यायचं, " या लक्ष्मीला रूपवान, चारित्र्यवान, कर्तृत्ववान माणसं आवडतात. आम्ही तसेच होऊ. पूजा करू. उपकार करणारांबद्दल कृतज्ञ राहू. सदाचरणी असू. गुरुजनांना मानू. आईवडिलांच्या आज्ञेत राहू. आत्मविश्वास बाळगू. क्षमाशील असू. तू आमच्या घरी राहा. आम्ही तुझी अखंड सेवा करू..." असं आजोबांनी सांगितलेलं म्हणावं न् देवीला

प्रसन्न करून घ्यावं. उरीपोटी दाटतेलं हे मग हळूच ओठांवर खेळायचं न् झोकात आजोबांची शाबासकी मिळायची...

त्यामुळं दुसऱ्या दिवशीच्या पाडव्याला आमची आई बाबांप्रमाणंच खुशीनं आम्हालाही ओवाळायची...तिच्या ताटात आमच्या प्रेमाश्रूंचे दोन थेंब घरंगळायचे न् मग ती आम्हाला कुशीत घेत अशी पोटाशी धरायची की, या दिवाळीला रोज रोज यावं असा मोह व्हावा.

दिवाळीची खरी गंमत आमच्या घरी पाहायची तर येणारानं भाऊ-बीजेलाच येऊन बघावं. आमच्या गावात ज्याच्या त्याच्या घरी—

अंगड्या टोपड्यांनी पेठ करिती झगाझगा
भाचा मामाचा टोपीजोगा

अंगडया टोपडयांचा शिंपी वाडयात बोलावला
भाचा कडीचा दावा मला

पिंपळपानाची सावली पडती जोत्यावरी
भाचा मामाच्या कडेवरी

असली भाषा चाललेली ऐकू येईल. जिकडं तिकडं बारक्या पोरांची वर्दळ न् हसणं खिदळणं कानावर येईल. पैंजण वाळ्यांच्या दणक्यानं गल्ली बोळं गरजतेली दिसतील आणिक शेजीराणीच्या ओठांवर—

उचकी लागली मला सकाळपासनं
सावळा बंधुराया आला बघा लांबून

तांबड पागोटं ऊन्हानं भडक्या मारी
सुरूच्या झाडावरी दादाराया

सोनसळे गहू रवा येतो दाणेदार
धाकला बंधुराया माझा फेण्याचा जेवणार

चंदनाचे पाट मांडीले ग हारोहारी
सांगते शेजी तुला बीज आज माझ्या घरी

दिवाळीचा सण अंगण झालं ओलं
सांगते शेजी तुला भाऊबीजेला दादा आलं

यातील अपूर्वाई खुललेली कानावर येईल. ध्यानी मनी नसताना सोन्या चांदीच्या घंघाळात मग सूर्यदेव डोलेल. रसवंती बोलणं ढेलजेत घुमेल. माहेरचा चंद्र साक्षात येऊन पुढं उभा राहील.

एकदा तर कमाल झाली. एका माणसानं सहजी बोलावं तशी गोष्ट केली. " मजी त्येचं काय हाय की, एक भाऊ न् एक एक भैन. लईदी भाऊ भेटला न्हाही म्हणताना भैन विचारात पडली. तिच्या हातच्या काकनात भाऊ दिसाय लागला. सपान पडावं तसा. तशी एक रोज थानचं प्वार काकंला घिऊन ती गेली भावाकडं. गेली तर दारात भावजं गुजरी ! हिला बगून ती काय म्हंती, ' काय करू बैन्स, बसाय जागा दीन म्हटलं तर जागा हाय वल्ला न् भाकरी करीन म्हटलं तर तवा की वो वाळून खाल्ला ! आता वो काय करू ? ' ...भैन काय समजायचं ते समजली. आच्यारी का विचारी झाली. तिनं ' माज्या दादाला सुखी ठेव ' म्हणून गावच्या देवाला हात जोडले न् घरला गेली रडत. भावाला हे कळलं मात्र न् तो मनात चरकला. बायला मी असं हाय काय म्हटला न् गेला आल्या पावली शेताला परत. घटकाभर चिंतागती झाली. केला विचार. जुपली बैलं गाडीला न् आला घरला दाण्दाण् गाडी उधळीत. तर ही कशी म्हंती, ' काय झालंय तवा ही धांदल ? कुठं निगालायसा ? ' मग ह्यानं घरातलं सगळं सामान उचलून गाडीत भरायचा दणका लावला न् तोंडानं बडबड केली, ' अरारा ऽऽ रांडऽऽ लई वंगाळ झालं ! ' तशी ही गलबलली. ' काय झालं ? ' विचाराय लागली. मग ह्या काय म्हटला, ' तुज्या बाच्या घराला आग लागलीया ! ... तवा हे सामान न्हेतूया मी ! ' ' अरे देवा ऽऽ ' ही लागली की ठो ठो बोंबलायला !... संगं येते म्हणाली ....

पण ह्येनं ढम्म म्हटलं न्हाई. ' माजं मी बगतूया.' म्हटला न् जी गाडी दणाणू पळीवली ती थेट भैनीच्या दारात आल्यावर थांबीवली ! भैनीला लई आनंद झाला. भावाला अवचितच बघून ती हारखली. चक्री जेन बसाय टाकलं. चंबू झारी भरून चूळ भराय दिली. भावाला कडकडून भेटली. ' बरं झालं बाबा आलास ' म्हटली न् उतरंडीच्या साळीडाळी काढून रांधायला गेली घारात. तंवर ह्यो फाकड्या गेला की सारं तिथंच टाकून ! हिला ते कळलं तशी पळत सुटली. मग ह्येनं म्हटलं, ' तुज्या बाचं हाय, असूं दे ... '' गेला तसाच झपाट्यानं निघून.

इकडं तंवर त्येच्या बायकूचं रडून रडून हे डोळं सुजलं. नवऱ्याला बघून तिनं कसं काय विचारलं. ह्यो बेस हाय म्हटला. मग ही बोलली, ' आन् गाडीबैल ? '

' गेली उडून ! ... गेली वाहून ! ... असं वारं सुटलं न् असा पाऊस आला की, गेलं पाक कुठल्या कुठं !...'

' आरं माज्या नशिबा ! असं कुठं झालंय काय ? ' तिला संशय आला. ह्यानं पण मग तिला विचारलं, ' बसाय जागा दिन म्हटलं तर जागा हाय वल्ला न् भाकरी करीन म्हटलं तर तवा वाळूनं खाल्ला असं तरी कुठं झालंय काय गा तवा ? '

तर अशातलं काय घडलं बिडलंय काय ? '' असं विचारीत मामांनी आईचे कान भरले. तिचा जीव उडून गेला. ती म्हणाली—

काशीतले कागद आले बाई डब्यातून
वाचले सोप्यातून आता बाई

मग असं कसं ?

इतक्यात आमचे मामाराया खुद्द आले न् त्यांनी अशानं असं आहे कळल्यावर त्या चांबूट्याची कचकून हजेरी घेतली. घरात मग आनंदी आनंद झाला.

आम्ही फराळाचं खाल्लं. पाची प्रकारची पक्वान्नं जेवलो. तुपाच्या द्रोणात भिजवून पोळी खाल्ली. निरशा दुधात सोनकेळ खाल्लं. रामफळाची चव घेतली. पोटभर जेवून ढेकर दिला. तशी मग...

दिवाळीच्या दिशी माझं ताट लागे जड
सावळा बंधुराया घाली वाक्यांचे जोड

दिवाळी दिशी माज्या ताटामंदी सोनं
आता ववाळीते बया, बाई तुजं तानं

दिवाळीची चोळी भाऊबीजेची चंद्रकळा
बंधु झाला उपराळा मायबाईचा सावळा

माझे दोघे बंधु बिल्लोरी आरसे
देवळी सरसे लावीयेले

भाऊबीजेच्या कारणानं मपल्या भावाला ववाळीन
सावळा घालील नव्या पुतळ्या वंजळीनं

भाऊबीजेच्या झोकानं असलं सुख आमच्या घरी उतरलं. एका शिंपल्यातले दोन मोती एकमेकांना भेटले. जाई मोगऱ्यांच्या सुखा समाधानाची जंगी दरवळ घरभर सुटली ...

त्यासरशी आमच्या सगळ्यांचेच नेत्रदीप असे पाजळले गेले की त्यांची सर कशालाच येऊ नये. ओवाळणीच्या ताटातील निरांजनं सरस का ही नेत्रांजन सरस असा भ्रम पडलेल्या आमच्या आईनं मग आम्हाला असं पोटाशी धरलं की त्या सुखापुढं अस्मान देखील ठेंगणं व्हावं म्हटलं तर !... खरं ना ?

■

# १३

## चैत्रांगण

थंडीनं माघार घेतली न् उन्हाळ्यानं मान वर काढली की, सूर्यदेव दारी यायच्या आत आमच्या घरी सडा रांगोळी झोकात झालीच पाहिजे असा आमच्या सदाफुली काशी मावशीचा तगादा असायचा. त्यामुळं भल्या पहाटेचं कोंबडं आरवलं न् बायकांनी माजघरातल्या जात्यावर बसत ओव्यांचा भडिमार उडवला की, तोंडावरचं पांघरूण काढीत आमचं ध्यान लगबगीनं उठायचं. अंगणात जाऊन रांजणातलं पाणी चंबू-झारीनं काढीत हात-पाय न् तोंड धुवून मोकळं व्हायचं. तांबडं फुटलं की, हळूच गोठ्यातला खराटा आणून भरारा अंगण लोटीत न् हिरव्या ताज्या शेणाचा सडा घालीत तऱ्हेतऱ्हेची रांगोळी काढून मोकळं व्हायचं. त्यातून गुढी-पाडवा आला न् काशी मावशीची तब्येत ठीक असली की, घरात हौसमौजेला उधाण येऊन घरात खाण्यापिण्याची चंगळ उडून जायची.

काशी मावशीला देवादिकांचा दांडगा सोस. त्यामुळं दंडबाह्या दुखस्तोवर तिला गंध उगाळून दिले म्हणजे ती आमच्यावर प्रसन्न होऊन म्हणायची, " चंदनाची उटी लावीन माझ्या सोनीला " त्यासरशी चटकिनी उठून तिच्या कुशीत शिरत आम्ही पण तिला विचारायचे, " चैत्रगौरीचं म्हणतीस काय तेव्हा उटीची भाषा ग ? "

" होय, होय चैत्रगौरी येऊं दे. तिच्यापेक्षा तुमचा डामडौल करीन मी

चांगली करा सडारांगूळी, हळदकुंकवाच्या हातव्यांची पायघडी घाला. चैत्रगौरी झोकात येऊं दे..." राजीखुशीनं काशी मावशीची मान हलली व गालावर खळी पाडतं तिचं नाजूक हसू दिसलं की, आमच्यासारखे श्रीमंत आम्हीच व्हायचे. कारण गौर केव्हा का येईना तिच्या अगोदर जरीकाडीच्या चिरड्या ती आम्हाला आणायची ना नव्या कोऱ्या ? म्हणताना सांदीकोपऱ्यात फडक्यात गुंडाळून ठेवलेल्या लाकडाच्या शिवगौरींना तिच्या नकळत आम्ही अभ्यंगस्नान घालून केव्हाच मोकळे व्हायचे. ह्या शिवगौरींना भरजरी वस्त्रं घालावीत, शेलक्या अलंकारांनी नटवावं आणिक त्यांची पूजा बांधावी असली तिला फार हौस ना ? .... म्हणून तर !

काशी मावशीच्या हाताखाली अशा वेळी पडलेलं काम उचलीत आखलं मिरवलं की, ती कवतिकानं म्हणायची, "तुम्ही पण रमा उमा व्हाल. देवी पार्वतीचं रूप लेणाऱ्या व्हाल. देव तुमचं कल्याण करील..." आम्हाला भुलून जायला तेवढं पुरेसं व्हायचं. त्यामुळं भल्या पहाटेला उठून तिनं आंघोळयांघोळ उरकली की, आम्ही तिचा कित्ता गिरवलाच असं व्हायचं. म्हणताना तिचं पोट जसं आमच्या एकीच्या खुशालीनं गच्च भरायचं !

आमच्या ओसरीवर एक देव्हारा असायचा. त्या देव्हाऱ्याला रंगबिंग देऊन ठेवलेला असे. तिथं रेशीम बैठकीवर केशर चंदनाच्या शिडकाव्यानं न् पानाफुलांनी शिणगारलेल्या गौरीला मांडलं जाई. नव्या कोऱ्या वस्त्रालंकारांनी त्यांना सजवलं जाई. त्यांच्या पूजेच्या वेळी घावन घाटल्याच्या नैवेद्याबरोबरच दूध-साखरेचा न् एखाद्या चविष्ट फळाचाही नैवेद्य दाखविला जाई. त्यातलं मग बरंचसं आमच्या हातावर येत असल्यानं आम्ही मोठ्या ऐटीनं देवीला नमस्कार करीत असू. मोठ्या-बायकांच्या प्रमाणंच आम्हाला पण देवीचा आशीर्वाद मिळून आमचंही भलं होऊंदे या कल्पनेनं आंगणातल्या रांगोळ्या झोकात काढीत असू. या त्यातल्या त्यात चैत्रांगण नावाची रांगोळी काढताना आपण देखील या काशी मावशीप्रमाणं व्रतधारी आहोत अशी ऐटी मिरवीत उगाचच आम्ही इकडून तिकडे

करीत असू.

या रांगोळीत समाविष्ट झालेल्या चंद्र, सूर्य, शंख, चक्र, गोपद्म, पंखा, मासा, तुळशी वृंदावन, जलानं भरलेला घट, दवणा, कासव, पाच भावल्या, रथ अगर पाळणा, राधाकृष्ण किंवा शिवगौरी, स्वस्तिक, त्रिफळ, हत्ती इत्यादींच्या चित्राकृतींना रेखताना धांदल उडून जायची. एका रांगोळीत सारं जिथल्या तिथं न् रेखीव आलंच पाहिजे असा काशी-मावशीचा तगादा असायचा ना? कारण हे सारं काढताना आपल्या आयुष्यातील धार्मिक आचारविचार आपण सांभाळतो असं तिचं म्हणणं असायचं. त्यामुळं चापून चोपून तयार केलेल्या चौकोनावर सारवण-सुरवण करीत रेखाटलेली ही रांगोळी बघायला आमच्या घरी पुष्कळांचं येणंजाणं व्हायचं, त्यातून हळदीकुंकवाच्या वेळी येत्याजात्येल्या लेकी-बाळींच्या न् सासूसुनांच्या वर्दळीनं आमच्या अंगणातल्या रांगोळीची वाहवा केलीच पाहिजे असं काशी मावशी आवर्जून पाह्यची. कधी कधी स्वतः पण लक्ष घालून काढल्या चित्रावरून हात फिरवायची. एवढंच नाही तर त्या दिवशीचं आमचं नटणं मुरडणं न् वेणीफणी स्वतः नीट-नेटकी करून सोडायची.

हळदीकुंकवाच्या दिवशी भल्या पहाटेला उठून तोंडाला दूध न् हळद माखीत शिकेकाईनं नहाणं व्हायचं. सर्वांचे केस पुसल्यावर ते धूप घालून धुपविले जात. त्यामुळं आवळा, माका यांच्या मिश्रणानं घरीच तयार केलेल्या तेलात वाळा, गव्हल्याचा कचरा, मिसळल्या कारणानं केसांना सुगंध येई. चेहऱ्यावर तजेला दिसे.

आम्हा लहान लहान पोरींच्या केसांची बुरकुलं तोंडावर येऊ नयेत म्हणून काशीमावशी आमच्या मिऱ्या वेण्या घालायची. त्यामुळं सगळ्या कपाळभर दोन्ही बाजूंनी बिंदी घालावी तसा थाट येई. झालंच तर पाठी-वरच्या पाचपेडी वेणीवर प्रत्येक पेडागणिक सुंदर नक्षीची सोन्याची फुलं गुंफली जायची न् वेणीच्या टोकाला खुळखुळतेल्या सोन्याच्या टोपणांचे गोंडे बांधले जायचे. माथ्यावर राखडी केवडा न् मिऱ्या वेणीवर चंद्रफुलं

बसवली जायची. तशी सुंदर कशीद्याच्या धारवाडी चोळी परकरातल्या आम्ही पोरी चुटचुटू हलायच्या. आमच्या गळ्यातल्या दुडी, एकदाण्या न् चंद्रहार हळदीकुंकू देताना आम्ही वाकलो की, पाहण्याऱ्यांच्या नजरेत भरायचे...बिंदल्या बिलवराचे आमचे हात न् पैंजण वाळ्यांचे पाय झोकात छुमछुमायचे. मजा वाटायची.

एखादी नवरी मुलगी हळदीकुंकवाला आली म्हणजे तिच्या अंगावर गोठ पाटल्या, तोडे बिलवर, टिका ठुशी, सरीसाज, नथ बुगड्या, वेलभोकरं, बिंदी बिजवरा, वाकी बाजुबंद, कंबरपट्टा, तन्मणी लफ्फा, पुतळ्या, साखळ्या, तोरड्या असलं काय काय नीटनेटकं अंगावर आहे की नाही हे आवर्जून पाहिलं जायचं. शिवाय हिरे, माणिक न् पाचू जडवलेली नथ तिनं घातलीय की नाही याची पण विचारपूस व्हायची.

त्यामुळं शालू, पैठण्या न् जरीकाठी इरकली लुगडी नेसून आलेल्या बायकांना हळदी-कुंकू देऊन, अर्गजा अत्तर लावून, फुलगजरा देऊन, वाटली डाळ न् पन्हं देऊन ओल्या हरभऱ्यांनी त्यांची ओटी भरताना आमच्या घरातल्या सगळ्यांचीच तारांबळ उडून जायची.

त्या धांदलीत आपण त्या दिवशी घरी जेवायला, वाढायला अशी बोलावणी कुणाकुणाला केलीवती. हळदीकुंकवाला कुणाकुणाला निमंत्रण दिलंवतं. शिवाय दारातली रांगोळी बघून कोण कोण सवाष्णी आल्यावत्या, त्यातला नेमका पत्ताच लागायचा नाही. अशा वेळी भांबावल्यागत कुणी दिसलंच तर मूदन् अग्र फुलाचा खोपा घातलेली एखादी हसून म्हणायची, " चालयचंच. देवीची पूजा बांधायला आलीय. येऊ दे. सौभाग्याचं वाण द्यावं घ्यावं. आपलं न् त्यांचंही भलं होतं. घरात समाधान नांदतं. जिकडं तिकडं मांगल्य नांदत. अशा गर्दीच्या दाटीवाटीनं चैत्रांगणाला शोभा येते. "

गोष्ट खरी होती. काशी मावशीच्या हौस-मौजेला अशा वेळी उधाण यायचं. नात्यागोत्यातल्या, ओळखीपाळखीतल्या इष्ट मैत्रीतल्या बायका, लेकीसुना घरी आल्यागेल्या या कल्पनेनं तिला अस्मान ठेंगणं व्हायचं.

एकमेकीत होणाऱ्या बसण्या बोलण्यानं न् विचारपुशीनं घरातल्या समाधानाला बरकत यायची. जुन्या परिचयाला उजाळा दिला जायचा. ध्यानी मनी घोळतेलं अगत्य वाढीला लागायचं. कोण कसं कोण कसं त्यातला अंदाज घेतला जायचा. त्या कारणानं चैत्रांगणात होतेली ही धावपळ शीणभाग विसरून जायची. एखाद्या लग्नकार्यासारखा डामडौल या वेळी उभा राहात असल्यानं आमच्यासारख्या खऱ्या श्रीमंत आम्हीच असा भास व्हायचा ! त्यातून गौरीप्रमाणंच आमच्या हातांवर चंदनाची उटी लावीत तिच्यावर शिंपली फिरवून नक्षी काढलेला चमचमणारा आमचा हात खालीवर न्याहाळताना न् माक्याचं काजळ लावून थंडाई उभी करीत आमच्या नेत्रकडांना शोभा आणलेली पाहाताना जर कुणी "तुमची काशी मावशी लई लाडाकोडाची" असं म्हटलं की, आम्हाला आमचं पण भान उरू नये अशातली गत होऊन जायची !

त्यामुळं काशीमावशीच्या भोवतीभोवती मिरवताना न् हाताखाली वावरताना आपल्याला खंडीभर गणगोत आहे या कल्पनेनं गौरींना दंडवत घालतेवेळी काशी मावशीसकट आपलंही उदंड होईल या विचारानं आमचे पाय तर जमिनीला ठरायचेच नाहीत !...शिवाय अक्कलही अशी भारावून जायची की, काय न् कसं सांगावं ? छे ! त्यातलं कोणतं एक नक्की सांगायला कोणत्या शब्दांची मनधरणी करावी आम्ही ? जमणारच नाही तर ! विचारा कुणालापण हवं तर !

■

# १४



## संन्याशाचा बाळ

आळंदीला गेलं की, शेंडीचा नारळ न् पानफूल इंद्रायणीला वहावं, हलत्याबोलत्या तिथल्या तुळशीसख्यांशी पोटभर गुजगोष्टी कराव्यात आणि वाटेनं जरीपताका भुईला लोळवीत दिंड्या घेऊन येतेल्या आळंदी-करांजवळ ज्ञानदेवांची विचारपूस करावी हा मनोभाव संगं घेऊन आम्ही त्या दिवशी आळंदीला गेलेलो. पाहातोय तर राऊळाच्या दाराशी फुलांचं अंथरूण झालेलं. बुक्क्याच्या पायघड्यांनी समाधीची वाट रंगलेली. हरि-नामाच्या गजरानं सारं राऊळ घुमतेलं. बारकऱ्यांची तोबा गर्दी उसळलेली. दिंड्यापताकांच्या नाचानं राऊळाचं अंगण सजलेलं. माणसाला माणूस भिडलेलं. म्हणताना त्या गर्दीतून वाट काढीत पुढं गेलो तर समोर ज्ञानदेवाची तसबीर ! ती पाहिली मात्र न् त्या देखण्या रूपानं मोहिनी घातलेलं मन पुटपुटलं—

सोन्याच्या मुद्‌रूका देवा ज्ञानूबाच्या गाली
मुरदुंग वाजवितो पाची बोटांची एक टाळी

आळंदी गावामंदी देवा ज्ञानोबाचं ठाणं
दारी सोन्याचा पिंपळ त्याला जडावाचं पान

आळंदीच्या पारावरी सांडली कसली फुलं
भैन मुक्ताबाई बोलं आमी संन्याशाची बाळं

कुठं कुठं ऐकलेल्या आठवणींचं गाठोडं आपल्या मनानं सुटलं. अजानुवृक्षाच्या सावलीत बसलेल्या ज्ञानदेव माऊलीच्या नावाचा जयघोष मुखी आला...तशी तिथं आलेल्या कुण्या एकीनं आम्हाला एखादी कहाणी सांगावी त्या झोकात ऐकवलं—

आळंदी देशायाला आलो आपुन मैतरणी
ज्ञानूबाच्या पायरीला देती हेलावा इंद्रायनी

आळंदीचा पार देवा ज्ञानूबाला साजू
त्येच्या ग आंगूळीला इंद्रावनी डाव्या बाजू

आलो सये आपुन आळंदी गावाला
चंदनाची उटी वाहू ज्ञानूबा देवाला

त्यासरशी चित्ताची सावधानता ठेवून आम्ही सभामंडप गाठला. हरिकीर्तनाचा तिथला सोहळा पाहिला. पुढं पुढं गेलो. चांदीचा नक्षीदार दरवाजा ओलांडून आत गाभाऱ्यात प्रवेश केला. ज्ञानदेवांच्या समाधीपुढं नतमस्तक होत समोरच्या विठ्ठलरखुमाईला हात जोडले. आळंदीची देशमुखी पत्करलेल्या ज्ञानदेवाबद्दलचा जनलोकांच्या उरीपोटी नांदतेला मनोभाव लक्षात घेतला. आळंदी गावाचा महिमा ऐकावा म्हटलं. म्हणून राऊळाला प्रदक्षिणा घालीत निघालो तर कुणीतर कानावर घातलं—

आळंदी वसली इंद्रायणीच्या गाळानं
जित्ती समाधी घेतली चौदा वरसाच्या बाळानं

आळंदी गावात भैनभावांची पीरत
ज्ञानोबा शेजारी मुक्ताबाईची मूरत

आळंदीचा मठ कुण्या गवंड्यानं बांधीला
ज्ञानेश्वर मावलीचा वर अभंग मांडीला

काय सांगू सये आळंदीची ग रचना
बैसले ज्ञानदेव नामा करितो कीर्तना

साधूला पुसे साधू आळंदी किती कोस
ज्ञानदेवाच्या ग माज्या टाळविण्याला मोतीघोस

आणि एकेक आख्यायिका अशी काय सांगितली की, माणसाला आपलं देहभानच सुटावं.

हिऱ्या माणकांच्या दिव्यांनी लकाकतेल्या सोन्याच्या आळंदीत काय दिसलं ? तर म्हणं की, इंद्रायणीच्या काठाला साधुसंताचे तळ पडलेवते आणि तिथं तुपाच्या हिल्ल्याळांचा उजेड आलावता ! सोन्याचांदीच्या गिंडीतलं पाणी इंद्रायणी त्यांना पाजतेली. दिंड्या मागं दिंड्या येतेल्या. हरिनामाचा गजर होतेला. तशी एकेकानं निरोप आणलेला—

सांगून धाडीते ग ज्ञानूबा खाशायाला
बुंदीची मेजवानी इंद्रायणीच्या माशायाला

आणि त्या गर्दीत एक नवल पण विपतेलं—

आळंदी गावामंदी मूर्ती आल्या त्या नाजूक
चांगदेव हाती शोभे सर्पाचा चाबूक

चांगदेव साधू आले सर्पावं बसूनी
ज्ञानोबारायांनी भिंती चालवील्या दोनी

माणसं भुलून गेलेली. नगरप्रदक्षिणा घालून कंदीलाची नाहीतर चिमणीची बात पुढं सारीत समाधीचं दर्शन घ्यावं म्हणतेली. वाघावर स्वार होऊन आलेल्या चांगदेवाचा भ्रम घालवायाला त्रसल्या भिंती

चालवितेल्या ज्ञानदेवाला काय काय विचारावं म्हणतेली... त्या धांदलीत बोलबाला झालेला—

चांगयाचं पत्तर कोरा कागद केली घडी
देती उत्तर ज्ञानदेव लाभे मोक्षाची ऐलथडी

इंद्रावनीच्या काठायाला डेरे दिल्याली खुतनीचं
ज्ञानूबा तुकाराम साधु आल्याती पैठणीचं

वाकरीच्या माळावरी दस्ती रुमाल वाळत्याती
ज्ञानूबा महाराज साधू रिंगान खेळत्याती

मातीचं खापर न्हाई कुंभारानं दिलं
ज्ञानूबाच्या पाठीवरी मुक्ताबाईनं मांडं केलं

इंद्रायनीच्या काठायाला झाडं तुळशीची हालत्याती
देव बी ज्ञानूबा साधु समाधी बोलत्याती

आणि डोईवरच्या फुलांच्या पाटीनं लवतेल्या माळणीगत माणसं 'असं नाही ?' चा झोक उडवतेली !... चांगदेवाला शहाणपण देतेल्या ज्ञानदेवांनी रेड्याच्या मुखी चारी वेद बोलविले त्याची वाहवा होतेली. इंद्रायणीत स्नान करून देहभांडं उजळून काढलेल्या लोकांनी भिंगाची दाट घरं असलेल्या वस्तीमधून पायवाट काढीत आळंदी कशी गाठली त्याची पोथी चालवलेली. अजानुवृक्षाच्या छायेखाली बसून ज्ञानदेवी सांगितलेल्या बाळराजाची स्तुती मांडलेली. इंद्रायणीच्या धक्याला बसून ऐशी मृदुंग न् नऊशे टाळ वाजवीत आलेल्या लोकांपुढं इंद्रदेवाघरी त्यांच्यासाठी मणामणाचं पुरण शिजतेलं. तुपाचे द्रोण वहातेले ... पाची पक्वान्नांची ताटं शिजतेली...त्यामुळं जिथं तिथं घरोघरी आवाज घुमतेला—

ज्ञानदेव पावणे ऐक सखे साजणी
आता घाल्ढ नका लई दुधाला धारवणी

आणि पाठोपाठ दिंड्या पातकांच्या भाराखाली सारं गाव सुखावलेलं—

नाचत नाचत दिंडी आली माज्या वाड्या
देवा त्या ज्ञानूबाला घालीते मी पायघड्या

नाचत नाचत दिंडी आली या वाड्यात
ज्ञानूबा देवायाचं दुधातुपांनी धुवा हात

नाचत नाचत दिंडी आणली घरात
ज्ञानूबाला दिली समदी पेढ्यांची परात

नाचत नाचत दिंडी जाईल सागरी
देवा ज्ञानूबाला दिल्या तुपाच्या घागरी

आळंदीच्या वाटेनं साऱ्या पताका जरीच्या
ज्ञानोबा मावलीच्या दिंड्या आळंदीकराच्या

अशी धमाल उडून गेलेली. त्या कारणानं तहानभूक हरपून गेलेली माणसं अवतीभवती 'आ' वासून बघतेली. चंदनाची उटी वाट्या भरभरून ज्ञानदेवांच्या अंगावर चढवायला धजावतेली आणि त्या नादात—

चंदन मैलागिरी उगाळीता गेले दंड
देव माजा ज्ञानूबा सोडी झग्याचे बंद

चल सये लवकर नको करूस घोटाळा
ज्ञानूबा सांगे अर्थ ऐके मुक्ताई चित्कळा

ह्या अप्रूपानं आणखीनच माणसं कावरीबावरी झालेली. तशी काय गंमत हं, अठ्ठावीस युगं विटेवरी उभं असलेलं आळंदीतलं सावळ्या पांडुरगाचं ध्यान खाली उतरून सभामंडपात आलेलं !... त्यासरशी तिथला चोखा-मेळा गेला पार हादरून ... नव्हं असं आक्रित घडलंच कसं? कोण आलंयम्हणून देवा पांडुरगानं स्वतः असं सामोर जावं म्हटलं?...

तेवढ्यात खुद्द केशीराजाचाच आवाज आला—

पांडुरंग म्हणे ऐक रुक्मिणी झणत्कार
हाती टाळवीणा आले आले ज्ञानेश्वर

झालं ! याचि देही याचि डोळा देवदर्शन घडलं या कल्पनेनंच लोकांनी दंडवत घातले. देहाचा मृदंग केला. हातांचे टाळ वाजवले आणि मुखी हरिनाम घोळू दिलं...

विटेवरी वीट आडुशाखाली गंगा
सख्या पंढरीराया धन्य तुझी पांडुरंगा

विटेवरी वीट केळी कर्दळीचा गाभा
पांडुरंगाचं रूप सावळी दिसे शोभा

विटेवरी उभा कुण्या नगरीचा राजा
देवा विठ्ठलाचा पांडुरंगाचा तुरा ताजा

रत्नजडित सिंहासनी द्वारकेचा राजा
त्याच्या ग पूजेसाठी आला ज्ञानूबाराजा

जाई मोगऱ्याचा वास सये सुटला कथेत
ज्ञानूबा महाराजांच्या गजरे साधूच्या हातात

तेव्हा माणसं बघताहेत तर ज्ञानदेव महाराज अभंग संकीर्तन करतेले आणि स्वत: विठूदेव हिऱ्यामाणकांनी लकाटलेल्या लेखणीनं त्यातलं एकेक टिपून घेत ज्ञानदेवांसमोर खाली बसलेले ! ...

देवाधिदेवांच्या या आगळ्या दर्शनानं आळंदी नगरी हारखून गेली. स्वत: रखुमाई माऊलीनं साधुसंतांच्या पंक्ती बसविल्या. त्यांना नाना परीची पक्वान्नं जेवू घातली. प्रत्येकाची आवडीनं विचारपूस केली. आशीर्वाद दिला...पंढरीचं सावळं परब्रह्म इथं साक्षात अवतरल्यानं आळंदी नगरी धन्य धन्य झाली...ज्ञानदेवांच्या कथा गीतांची पारायणं

होऊ लागली...ज्ञानियांचा राजा जनलोकांच्या काळजाचा घड ठरला... माणसं आवर्जून म्हणाली,

विटेवरी उभा युगं झाली अठ्ठावीस
सावळ्या शिरिहरी तुझी करीन ऊठबस

आषाढी कार्तीकीला सारा रावळ थापला
सावळा पांडुरंग हजरी घेणार एकला

कस्तुरीचा वास माझ्या अंगाला कुठला
ज्ञानदेव पांडुरंग मला सपनी भेटला

आणि मग पाहिला आळंदी नगरीनं आणखी एक चमत्कार. घराघरांतून बायकामाणसं बोलू लागली —

देहाचा देहपाठ मुठीच्या करते समया
ववाळीते आरती माजी तुला ज्ञानूबा राया

देहाचा देहपाठ बुद्धीच्या करते वाती
ज्ञानूबारायाला पंचप्राणांची आरती

पोथीला मी येते सयांनू जागा धरा
सावळा पांडुरंग उभा चांदणीखाली हिरा

आणखी...आणखी आपल्या सुंदर मनोभावांचे मोती ज्ञानदेवांच्या तुऱ्याला गुंफावेत म्हणून स्वतःची काया त्यांनी केव्हाच पांडुरंगावरून ओवाळून टाकीत घरापासून राऊळापर्यंत दंडस्थान घातलं सुद्धा! ...



## १५

# कल्लोळले हरिनाम

टाळमृदंगाच्या साथीत रंगलेलं भजन कीर्तन राऊळात शिगेला जाऊन पोचलं, त्या वेळी किती वाजले होते कुणाला माहीत. पण रात्रभर एका दीपमाळेशेजारच्या भिंतीवर त्या दिवशी उभ्या राहिलेल्या माझ्या दृष्टीला नजर आली त्या वेळी उगवतीनं मान वर केली होती, आणि सोन्यानं माखलेल्या सूर्यदेवानं मोत्यांच्या सडकांचा शिडकावा माझ्या आवतीभोवती केला होता. म्हणताना मी थोडं आजूबाजूला पाहिलं तर लोकमातांनी खळाळत येऊन राऊळाला प्रदक्षिणा घातली होती आणि मोहोरलेल्या पानाफुलांच्या पायघड्या राऊळात पसरल्या होत्या. मोत्या पोवळ्यांना मागं टाकणाऱ्या दवबिंदूंच्या किनारीनं वंदनमालिका सजल्या होत्या आणि शिरेवरील तृणपुरुष आपली मान ताठ करीत येणाराजाणारांना खुशीनं पालवीत होता.

त्या नादात अमृताच्या सहस्र धारांनी आळविलेला विठूदेव अठ्ठावीस युगं पायाखाली ठेवलेली भाग्याची वीट सोडून खाली उतरला, म्हणताना कल्लोळलेल्या हरिनामाचा दाट गजर झाला आणि माणसं आश्चर्यानं चकित होऊन गेली! म्हणाली की, " असं कधी झालं नाही, कधी व्हायचं नाही, तर हे घडलं कसं आणि हा चमत्कार व्हावा असं दुनियेवर झालं तरी काय?" म्हणून बघतात तर दाराशी ज्ञानियांचा राजा हाती मायमराठीच्या अभिमानाची पताका घेऊन उभा ठाकलेला

आणि विठूदेव जातीनं त्याला सामोरे जातेले! त्यासरशी सारं राऊळ सूर्यदेवाच्या आगमनानं शोभायमान झालं आणि जणू काय त्यानं ह्या दोघांना वाटेत प्रकाश दाखविला. माणसं चित्रातील भावलीप्रमाणं स्तब्ध झाली आणि त्यांच्या नजरेनं भूलोकीच्या वैकुंठभुवनीचं हे वैभव नजरेनं मनसोक्त टिपून घ्यायचा निर्धार केला. त्यासरशी...

अर्थ बोलाची वाट पाहे। तेथ अभिप्रावो अभिप्रायाते विये।
भावाचा फुलौरा होत जाये। मतिवरी ॥

उभ्या राऊळात हा आणखी एक चमत्कार दिमाखानं पुढं आला आणि मग —

सुखाचे ओतलें। दिसे श्रीमुख चांगलें ॥
मने धरिला अभिलास। मिठी घातली पायांस ॥

होता दृष्टादृष्टी। ताप गेला उठाउठी ॥
तुका म्हणे जाला। लाभे लाभ दुणावला ॥

विठूदेवाच्या दर्शनाचा हा आनंद सर्वांनी पोटभर लुटला. उभं राऊळ जसं काय त्यासरशी पांडुरंगमय झालं आणि देहभावातील मीपणाचा अहंकार पूर्णपणे गळून गेला. तिथं जमलेली माणसं आभाळाएवढी मोठी झाली! त्या वेळी ईश्वराच्या प्राप्तीसाठी, दर्शनासाठी, साधना चालू ठेवून अहोरात्र हरिनामात दंग झालेल्या जनलोकांची ब्रह्मानंदी टाळी लागली. आणि मग सामान्य माणसालाही जणु कवित्व स्फुरलं! भावना मोहोरली. शब्दांचा मळा फुलला. कल्पनेला वाचा फुटली. इंद्रियांना जिव्हा प्राप्त झाल्या ...

हरिनामाच्या गजरानं पुनीत झालेला आणि चंद्रभागेत स्नान करून देहभांड उजळून काढलेला माणूस केशीराजाच्या या दर्शनानं एवढा भुलून गेला की, त्याला जसं काय अस्मान ठेंगण झालं. देहभान विसरून त्यानं देवाला दंडवत घालीत आपली भावना त्याच्या पायाशी शिंपली—

पंढरपुरी भीमातीरी
भक्ति विठ्ठलाची जी
हरिनाम घ्या तुमी मुखामंदी
सुटका जल्माची जी
चंद्रभागेच्या तीरी
आंगुळ करावी गंगेची जी
जाईल पापाची धुनी पुढं
एक पायरी धर्माची जी
अहो राऊळामंदी जाऊनी
भेट घ्यावी रंगरायाची जी
माघारी येताना गळ्यामंदी
माळ घालावी तुळशीची जी
उदबत्त्याची झाडं देवापुढं
गर्दी अबीराची जी

आणि मग या भावनेनं भारी उचल घेतली. माणूस खुळाभैरा झाला. बाडवडिलांची पुण्याई पाठीशी घेत त्यानं श्रीरंगाला आपल्या भावगीतानं आणखी मनसोक्त आळवलं ...

चंद्रभागेतीरी पवा वाजवितो हरी
गोपाळाला पाचारीतो
आपुन खेळू एक्या ठाया
राधिकेच्या म्हाला जातो
गौळणी बोलावीतो
किती वंदू मी तुज्या पाया
तुला माज्या पंढरीराया



भांगतुरा या ग्रंथाच्या लेखिका डॉ. सरोजिनीबाई बाबर ह्या सध्या महाराष्ट्र राज्याच्या लोक साहित्य समितीच्या अध्यक्षा असून लोकसाहित्यविषयक त्यांचे लेखन सातत्याने चालू आहे.

सर्वसामान्य लोकांच्यात ऊठबैस करावी, त्यांच्याशी विचारविनिमय करावा, त्यांच्या सांस्कृतिक जीवनाची ओळख करून घ्यावी आणि त्यांच्या जवळच्या लोकसाहित्याचा वानवळा गोळा करावा ही डॉ. सरोजिनीबाईंची हौसमौज. त्यामुळे गेली वीस-पंचवीस वर्षे त्या गावोगावी फिरल्या. खेडयापाडयांतील असंख्य घरोघरी गेल्या. तिथल्या स्त्रियांच्या जीवनाशी एकजीव होत त्यांनी सर्व प्रकारचे लोकसाहित्य जमा केले. विषयवार त्याची मांडणी करून सचित्र असे सर्वांगसुंदर ग्रंथ संपादित केले. महाराष्ट्र शासनाच्या वतीने ते प्रकाशितही केले. त्यांची ही कामगिरी अनेकांनी गौरविली आहे.

सरोजिनीबाई भांगतुऱ्या द्वारे आपल्या मराठमोळ समाजाचे भावचित्र आपणासमोर उभे करतात हेच या ललित निबंधाच्या संग्रहाचे खरे सार. भांगतुरा हे आतून बाहेरून नितान्त सुंदर असलेले शारदेचे लेणे आहे असे कोणासही म्हणता यावे.